# अनिरुद्ध प्रवाह

[ लघुकथा-संग्रह ]

'कृष्णाबाई'

"जीवन



साहित्य"

: १ :

पुरुषोत्तम आत्माराम चित्रे : बडोदें

## प्रकाशकाचे दोन शब्द

'कृष्णाबाई' यांचा "मानसलहरी" हा पहिला कथासंग्रह डिसेंबर १९३३ मध्यें प्रसिद्ध झाला. त्यानंतर त्यांच्या 'प्रतिभा', 'पारिजात', 'संजीवनी' इत्यादि प्रमुख नियतकालिकांतून वेळोवेळी प्रकाशित झालेल्या आठ व अप्रकाशित दोन अशा एकंदर दहा कथांचा हा दुसरा संग्रह आज प्रसिद्ध होत आहे.

विद्यार्थीदशेंत केवळ हौसेखातर केलेलें 'करभार' या प्रातिनिधिक काव्यसंग्रहाचें प्रकाशन सोडलें तर प्रकाशनव्यवसायांत मी आज प्रथमच पदार्पण करीत आहे. अशा प्रसंगीं साहजिकच वाटणाऱ्या साशंकतेच्या भावनेपेक्षांही 'कृष्णाबाई' सारख्या लेखिकेच्या

अभिजात साहित्याचें प्रकाशन करण्याची जी संधि मिळाली तिचा अभिमानच मला अधिक वाटत आहे. अशाच वाङ्मयसेवेच्या कार्याची माझी महत्त्वाकांक्षा गुणग्राहक वाचकांच्या सहाय्यानें सफल होवो एवढीच इच्छा आहे.

प्रस्तुत प्रकाशनाचे कामीं ज्यांचें सहाय्य झालें त्यांमध्यें श्री. म. श्री. आपटे बी. ए., एल्‌एल्. बी. व श्री. शं. भि पोतनीस बी. ए. यांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला पाहिजे. याशिवाय, ज्यांच्या भावनेचें अव्यक्त सामर्थ्य या साहसाच्या पाठीशीं आहे त्यांच्याविषयींची भावना अव्यक्तच राहायला हवी.

वडोदें.
ता. १ सप्टेंबर १९३७

पु. आ. चित्रे

# कळ्यांचे निःश्वास कीं सुवास ?

क्रिकेटनैपुण्याबद्दल व उत्कृष्ट निबंधलेखनाबद्दल मिळालेलीं पहिल्या नंबरचीं बक्षिसें घेऊन, ' भावी नायडू ' वगैरे गौरवपूर्ण उल्लेख ऐकून प्लॅटफॉर्मवरून खालीं उतरतांना श्रीनिवास किती घामाघूम झाला, किती गोंधळला ! त्याच्या मर्दानी चेहेऱ्यावर लज्जेची किती झनानी झांक पसरली !

आपल्या ह्या विजयाबद्दल डाव्या हाताला बसलेल्या वेणी-गजरावाल्या विशिष्ट कंपूचें काय मत आहे तें अजमावण्याकरितां श्रीनिवासचा जीव किती तळमळला; परंतु त्यानें धैर्य करून तिकडे पहाण्याच्या आंतच त्या कंपूंत हास्याची एक लकेर उठून हवेंत विलीन झाली ! तो जेमतेम पुढच्याच रांगेंतल्या खुर्चीवर बसतो न बसतो तोंच एका धीट कोकिल कंठांतून " इतकं कशाला ग नर्व्हस व्हावं लागतं " असा जणूं काय मैत्रिणीला उद्देशून असा अगदीं शिताफीनें हलकेच उद्गार निघाला—पुन्हां हास्यलहरी ! बिचारा श्रीनिवास अगदींच गोरामोरा झाला ! ज्या कंपूकडून कौतुकाची अपेक्षा करावी त्याच कंपूकडून अशी टिंगल व्हावी यापेक्षां दुर्दैवाची गोष्ट ती कोणती ? गोऱ्यामोऱ्या चेहऱ्यानेंच श्रीनिवासनें घराचा रस्ता सुधारला !

श्रीनिवासचे हेच स्वभावविशेष बी. ए. पर्यंतचीं चारही वर्षें कायम राहिले–सुशिक्षित तरुणींचें जबरदस्त आकर्षण, परंतु त्यांच्या अंतरंगाबद्दल एकप्रकारचा परकेपणा व धास्ती ! लहानपणापासून त्याला कधीं शिकलेल्या स्त्रियांत मिसळून वागण्याचा सराव नव्हता. घरीं जुनें वळण; श्रीनिवास सगळयांत लहान भाऊ; वडील बहिणी होत्या, पण त्या अगदींच अशिक्षित–त्या जोडवीं घालीत, तुळशीची पूजा करीत, चातुर्मासांत नेमधर्म करीत, व सौंदर्यशास्त्रापासून शक्य तों अलिप्त रहात ! शेजारीं पाजारीं कांहीं तरुण अर्धवट शिकलेल्या पोरीसोरी असत, परंतु त्या घट्ट अंबाडा बांधीत, लोकरीचें विणकाम करीत, नवऱ्याच्या नांवाला लाजत, व आपल्या खुळचट रोमान्सचें मैत्रिणींच्याजवळ वर्णन करीत ! तात्पर्य काय कीं, कॉलेज-मधील मालिनी प्रधान, सुलोचना केळकर, व विशेषतः ललिता देशमुख इत्यादींच्या तुलनेला श्रीनिवासच्या मतें कोणीच टिकत नसे.

सुटी संपून व वरील अशिक्षित स्त्रीवर्गाकडे तुच्छतेनें पाहून परत आल्यावर श्रीनिवास क्रिकेटचा सेक्रेटरी निवडून येई, तर इंटर–कॉलेजिएट स्पोर्टस्च्या वेळेस लेडी स्टुडंट्सना वेगळा तंबू पाहिजे म्हणून सुलोचना केळकर भांडून त्याचा जीव नुसता बेजार करी, अन् एरवीं छप्पन फ्रेंड्सशीं तासन् तास गप्पा मारीत बसे ! बरं खटपटीनें तिची समजूत करावी तर ललिता सेक्रेटरीच्या स्त्रीदाक्षिण्याची टवाळी करी ! न करावी तर सगळयाच विद्यार्थिनी एकदम काहूर करीत ! बिचारा श्रीनिवास अगदीं गोंधळून जाई !

परंतु तीं भांडणें भांडतांनासुद्धां ललिता किती सुंदर कोट्या करी ! किती गोड, आकर्षक, सहज अभिनय करी ! भांडणाच्या निमित्तानें कां होईना, पण तिचा सहवास लाभावा अशी केव्हां

केव्हां श्रीनिवासला चुटपुट लागे ! किती मित्र असले तरी मैत्रिणीच्या सहवासाची मोहिनी कांहीं न्यारी ! स्त्रीत्वाचें आकर्षण व पुरुषाची बुद्धिमत्ता दोन्हीं एकाच ठिकाणीं सांपडलीं तर कोणता शहाणा पुरुष मित्र शोधायला जाईल? पण ती मैत्रिण भेटायला हवी ना?

  

वक्तृत्वोत्तेजक मंडळाच्या सभेंत ललिता वक्तृत्व करीत होती; किती बिनतोड मुद्दे आणि बोलण्याची किती आकर्षक पद्धत ! अनिमिष लोचनांनीं श्रीनिवास त्या मूर्तीकडे पहात होता; पण बोलण्याचा विषय काय ?–'हिंदु कुटुंबांत मुलांमुलींना वागविण्यांत पक्षपात करतात ! आम्हांला अन्याय होतो आहे !' श्रीनिवास मनांत विचार करीत होता "ह्या दृष्टीनं ह्या मुली किती चांगल्या –अशिक्षित स्त्रियांच्यापेक्षां ह्यांचं क्षितिज किती मोठं झालं आहे, मनाची किती सर्वतोपरी वाढ होत आहे, पण......"

ललिता देशमुख व सुलोचना केळकर यांच्या व्यक्तित्वाची एकच दिशा श्रीनिवासला माहित होती; त्या कॉलेजमध्यें येऊन परत जाईतोंपर्यंतची ! तेवढ्या वेळांत त्या फक्त शिकत, नटत, हंसत, कधीं भांडत ! श्रीनिवासला वाटे घरींही त्या हेच चार उद्योग करीत असाव्यात ! आणि त्यांच्या बद्दलच्या ह्याच कल्पनेचा पगडा असतांना श्रीनिवासनें बी. ए. होऊन एंजिनिअरिंग कॉलेजचा रस्ता धरला–सुशिक्षित स्त्रीजगापासून थोड्याफार धास्तीनें अगोदरच दूर रहाणारा श्रीनिवास आतां जास्तच दूर फेंकला गेला !

  

चार वर्षें गेलीं, श्रीनिवासचे श्रीनिवासराव झाले पण यापलीकडे त्यांच्या आयुष्यांत फरक पडला नाहीं ! वडिलांच्या आग्रहाखातर

ते एकदोन मुली पहायला गेले. कोणी 'चवथ्या' यत्तेंत, तर कोणी 'गृहकृत्यांत निपुण'! त्या संसाराच्या चित्रांतले रंग श्रीनिवासच्या डोळ्यांत भरेनातच! ललिता देशमुखच्या नुसत्या आठवणीनेंसुद्धां आंत कुठें तरी कसल्या तरी अनुकूल संवेदनांचे लाटातरंग उठतात असा त्याला भास होई! पण तिचीत्याची मैत्री नव्हती. ती आतां हुजूरपागेंत मास्तरीण होती. रस्त्यांत केव्हांतरी भेटली तर ती त्याच्याकडे पाहून किंचित् हंसून ओळख दाखवी अन् मग श्रीनिवासचे तीनचार दिवस कसल्या तरी हुरहुरींत जात!

पण श्रीनिवासच्या दृष्टीला, किंचित् कृश झालेल्या अंगकाठी-खेरीज ललितेंत कांहीं फरक दिसत नव्हता. तीच नटण्याची हौस, तोच हंसरा चेहरा, तोच अंबाडा व त्यावर नेमानें गजरा! पण तीच स्वतंत्र वृत्ति! आपण धाडस केल्यास यश येईल असा श्रीनिवासला भरंवसाच वाटेना! बिचारा श्रीनिवास! चक्रवाकांच्या जोडप्यांत कमळाचें पान, तसें त्याच्या व ललितेच्या मध्यें ज्या शिक्षणाला तो एवढा भाळला होता तें शिक्षणच होतें! बिचारा दिवसभर कामावर जाई, संध्याकाळीं परत आला कीं उदास होई! अगदीं संध्याकाळीं "तुजविण गमे वृथा संसार" असें गुणगुणत एकटाच भांडारकर इन्स्टिट्यूटकडे फिरायला जाई. परत आला कीं जास्तच उदास होई! आणि जरा धैर्यानें चारपांच दिवस काढतो तों पांचव्या दिवशीं बॅग घेऊन शाळेंत जाणारी ललिता भेटे, आणि बिचारा इंजिनियर त्याहून जास्त उदास होई!

असे कसेबसे दिवस चालले होते. चालले होते कसले, श्रीनिवास त्यांना अगदीं हातांनीं लोटीत होता! वडिलांनीं तरी किती दिवस वाट पहावी? तिशीच्या जवळ मुलगा आला!

पुन्हां एकदां एक गृहकृत्यांत निपुण अशी जुन्नरची मुलगी सांगून आली ! वडिलांनीं चिरंजीवांना विनवणी केली, " वाटल्यास करूं नको, पण एकदां जुन्नरास जाऊन मुलगी पाहून तर ये. " आतां श्रीनिवासचाच धैर्यमेरू डळमळूं लागला होता ! तो आतां आपल्या संसाराचें नीरस चित्र रंगवूं लागला. आपली पत्नी, माहेरून आणलेले गुलाबी रेशमी कापडाचे छप्पन लेसी लावलेले ब्लाऊज, वाजवीपेक्षां फाजील वांकडा भांग ! छे, त्या चित्रांत रंगच भरेनात ! वेषभूषेचें सहज कौशल्य, वागण्यांतलें सफाईदार पॉलिश, बोलण्यांतला लाडिकपणा, चालण्यांतलें लालित्य, कुठवर शिकवाव्या माणसानें ह्या गोष्टी ? एकवेळ तर्खडकरांच्या भाषांतर-पाठमालेच्या सहाय्यानें Bird बर्ड म्हणजे पक्षी, असा घोक्या मारून इंग्लिश शिकविणें शक्य आहे, पण रंगांत येऊन मध्येंच नवऱ्याला " अरे तुरे, " केव्हां म्हणावें, " अगदीं बच्चा आहे " असं केव्हां म्हणावें, हें कळायला कॉलेजकन्याच पाहिजे ! आणि अशिक्षित पत्नीशीं नुसत्या संसारावांचून कसल्या गोष्टी बोलणार, परंतु त्याच काय सारख्या बोलायच्या ? " पण जाऊं द्या, " श्रीनिवासनें एक दीर्घ निश्वास सोडला. " असेच विचार मनांत आणून आजपर्यंत अविवाहित राहिलों. ह्या एकलकोंड्या, नीरस आयुष्यांत पडलों. " मनाशींच आढेवेढे घेऊन श्रीनिवासनें पुढच्या रविवारीं जुन्नरास जाण्याचा निश्चय कायम केला व त्याच उदास मनःस्थितींत लॉ कॉलेजच्या टेकडीचा रस्ता धरला.

श्रीनिवासच्या पुढें थोड्याच अंतरावर कॉलेजांतील प्रौढ विद्यार्थिनींचा एक घोळका चालला होता व त्यांच्यांत कसला तरी वाद ऐन रंगांत आला होता ! श्रीनिवासचे उत्सुक कान साहाजिकच त्या वादाकडे वळले.

" ए, पण मला घरीं जातांना आठवण करा ग दिक्षितांच्या

दुकानांत जायची, आज मी तें विकतच घेऊन जातें, म्हणजे मला चांगला अभ्यास करून त्यावर भांडतां येईल," एक म्हणत होती.

"कशाला? तुला आतां तें विकत घ्यावंसं वाटतंय वाटतं?"

"वाटतं? कांहीं नको! मी देईन तुला वाचायला. आमच्या घरीं दोन प्रती आल्या आहेत."

"अग पण शालन्, दोन प्रती ग कशा आल्या तुमच्या घरांत?"

"अग कशा म्हणजे काय विचारूं नको! पहिल्यांदा धाकट्या काकांनीं आणलं, पण ते त्या पुस्तकाला विसंबेनातच. इतकं म्हणे त्यांना तें आवडलं, अन् मग दादाला मनोभावानीं वाचायला सवड मिळेना तेव्हां त्यांनीं जाऊन दुसरं विकत आणलं."

"खरंच शालन्?"

"मग खोटं सांगत्यें कीं काय? काल रात्रीं आमच्या घरीं दोन वाजेपर्यंत वाद चालला होता! काका अन् दादा म्हणत, "पुस्तक एखाद्या प्रौढ कुमारिकेनेंच लिहिलं असलं पाहिजे– त्यांतले कांहीं touches असे आहेत कीं ते स्वानुभव वाटतात." त्या प्रकारचें तें लिखाण आहे, अन् तेवढ्याखातर त्या 'कळयांच्या निःश्वासा'वर जसे काय फिदा झाले आहेत दोघेहीजण! मला म्हणतात, "तुला माहीत असेल कोण लेखिका तें." अग, पुस्तक राहिलं एकाच बाजूला अन् त्याचा लेखकच आमच्या घरीं वादविषय झाला आहे! अन् विशेष गंमत म्हणजे तो लेखक एक प्रौढ कुमारिकाच आहे असं म्हणायला साऱ्याच पुरुषांना फार फार आवडतंसं दिसतंय्."

"अग सहाजिक आहे, तसं असलं तरच ती आधुनिक सुशिक्षित स्त्रीजीवनाची first hand-information ठरेल, अन् तीच तर सध्यां पुरुषांना हवी आहे."

" पण खरंच सध्यांच्या स्त्रीजीवनाचं किती भेदक अन् मोकळ्या मनानं सत्यचित्र काढलं आहे त्या लेखिकेनं नाहीं ? "

" असेल, " शालन् थोड्या नाराजीच्या आवाजांत म्हणाली.

" कां ? असं नाखुशीनं कां ? " शरयूनें पृच्छा केली.

" चित्राच्या सौंदर्याबद्दल वाद नाहीं ग, पण घटकाभर समज शरू, तुला तुझ्या आईबापांनीं अविवाहित ठेवली-अगदीं स्वार्थाकरितां ठेवली तरी, वाङ्मयाच्या स्वरूपांत कां होईना, जनतेच्या न्यायासनासमोर आपल्या आईबापांना आरोपी म्हणून तूं उभं करशील का ? "

" पण असं म्हटलं तर सहेतुक वाङ्मयाची वाढच कठीण होईल—उलट आत्मप्रत्ययाच्या अनुभूतीचा आधार हाच वाङ्मयांत महत्त्वाचा आहे. "

" हो, पण आत्मप्रत्ययाचा आधार म्हणजे वैयक्तिक दुःखाचीं रडगाणीं नव्हेत. " शालन् ठांसून म्हणाली.

" वैयक्तिक सुखदुःखावरून निघणारे सामान्य सिद्धांत अगर व्यापक स्वरूपाचे सामाजिक प्रश्न कलात्मक स्वरूपांत मांडणें म्हणजे वाङ्मय, आपल्या सुखदुःखाच्या कथा म्हणजे वाङ्मय नव्हे. पहिल्या प्रकारच्या लेखकाची भूमिका ही द्रष्ट्याची भूमिका आहे, दुसऱ्याची याचकाची आहे. "

" अन् त्याबरोबर असंही नाहीं का ग, " आतांपर्यंत स्तब्ध असलेल्या कमलेला वाचा फुटली. " हे जर एका प्रौढ कुमारिकेचे अनुभव आहेत असं मानलं, तर त्यांत आपल्या भावभावना, इच्छा-आकांक्षा स्पष्ट बोलून दाखवण्याचं प्रशंसनीय मनोधैर्य आहे, पण आपलीं दुःखं हंसतमुखानें कुणाला न सांगतां, सोसायला मनोवृत्तींत जो एक प्रकारचा ताठर मानीपणा लागतो तो मात्र नाहीं असं वाटतं—सहानुभूतीची याचना केल्या-

सारखी वाटते. अन् म्हणून तीं रडगाणीं वाटतात."

"नसेल ग, कुणी प्रौढ कुमारिकेनं लिहिलंच नसेल. मला तर खास वाटतं कीं तें कुणीतरी पुरुषांनं लिहिलं असावं."

चपलेचा हा तर्क सगळ्यांना आवडला, पटला कीं नाहीं कोण जाणे !

पण त्या सगळ्या वादाचा श्रीनिवासवर मात्र फार परिणाम झाला ! तो तसाच परतला व International Book Service मध्यें जाऊन त्यानें चौकशी केली. तेवढ्या वेळांत ४।५ पुरुषांनीं 'कळ्यांचे निःश्वास' खरेदी करून नेलें !

  

अवघें १३६ पानांचें पुस्तक, पण श्रीनिवास तें एक रात्र व दुसरा पुरता दिवस वाचीत होता ! कांहीं गोष्टी तो पुन्हां पुन्हां वाची, आरामखुर्चीवर डोळे मिटून स्वस्थ पडे; एखादा नवा शोध लागावा, कधीं न पाहिलेला प्रांत पहातांना नवख्या मुशाफरानें आश्चर्य करावें त्याप्रमाणें पुन्हां पुन्हां आश्चर्यचकित होई ! पुन्हां पुन्हां श्रीनिवास वाचीत होता. "बाबांचा संसार माझा कसा होणार ?" "त्याग," "प्रेम कीं पशुवृत्ति ?" "रिकाम्या भांड्याचे निनाद,"–एका दिवसांत श्रीनिवासनें त्या पुस्तकाचीं अक्षरशः पारायणें केलीं !

चहा पिऊन ४॥ च्या सुमाराला श्रीनिवासनें पुन्हां नव्या दमानें पुस्तक उघडलें. सहाच्या सुमारास संपवलें. आतां एकाएकीं त्याची चर्या प्रफुल्ल दिसत होती ! हातांतलें पुस्तक समोरच्या वाटोळ्या टेबलावर भिरकावून खुंटीवरची कोटटोपी कशीबशी चढवून श्रीनिवासनें तडक ललितेच्या घरचा रस्ता धरला !

ललिता चकितच झाली !

"नाहीं म्हटलं, कॉलेजमधली ओळख नवी करावी पुन्हां,"

श्रीनिवासनें खुलासा केला !

" पण होती कधीं ?" ललिता मनांत म्हणाली, " तुम्ही कधीं आमच्याशीं बोलाल तर ना ! " श्रीनिवासचा त्या दिवशींचा मनमोकळेपणा ललितेला आश्चर्य वाटण्यासारखा होता !

७॥ च्या सुमारास श्रीनिवास केवळ नाखुषीनें परत जायला निघाला !

" अहो, इतके ओळख ठेवायला आलांत तर जरा लवकर तरी यायचं. धड गप्पा सुद्धां मारायला वेळ नाहीं खूपशा; आतां पुन्हां या केव्हांतरी सवडीनं, " ललिता म्हणाली. आणि अशा रीतीनें त्यांची पुन्हां एक दीर्घ मुलाखत व्हावी असा ठराव झाला.

त्या दिवशींची डायरी श्रीनिवास कितीतरी वेळ सविस्तरपणें लिहीत होता.

  

दुसऱ्या दिवसापासून " कळ्यांचे निःश्वास " एका स्त्रीनेंच, प्रौढ कुमारिकेनें लिहिलें आहे या मताचा श्रीनिवास अगदीं चॅम्पियन झालेला दिसत होता ! तो निकाल त्याच्या बुद्धीला पटण्यापेक्षां भावनेलाच अतिशय प्यारा वाटत होता !

पूर्वी बेत ठरविल्याप्रमाणें श्रीनिवास रविवारीं जुन्नरास गेला नाहीं. उलट ठरलेल्या ठरावाप्रमाणें त्याची व ललितेची त्या दिवशीं दीर्घ मुलाखत झाली अन् अशा दोनचार दीर्घ मुलाखतींनंतर एकींत पुन्हां ठराव झाला कीं येत्या रविवारीं सकाळींच श्रीनिवासनें ललितेच्या घरीं चहाला यावं ! अन् संध्याकाळीं ललितेनें त्याच्या फटफटींतून बंडवर जावं !

अन् त्यानंतरच्या एका प्रदीर्घ मुलाखतींत ठराव झाला कीं लवकरचाच मुहूर्त धरावा तें बरं ! उगीच दिवसगत कशाला ?

~ ~ ~

सुमारें एक महिन्यानंतरची गोष्ट ! श्रीनिवासनें वेळोवेळीं प्रेमानें विकत घेतलेल्या, परंतु दुर्लक्षामुळें धूळ खात पडलेल्या सुंदर सुंदर पुस्तकांवरून ललितेचा, त्याच्या साक्षात् लक्ष्मीचा, हात फिरत होता. सुंदर कव्हरांच्या सोनेरी अक्षरांच्या इंग्रजी पुस्तकांत, काळजीपूर्वक ब्राऊनपेपरचें कव्हर घातलेलें एकच मराठी पुस्तक होतें.

" कळ्यांचे निःश्वास "

" हें कशाला इथें ?" ललिता पुस्तक काढीत म्हणाली. " जाऊं दे त्या मराठी कपाटांत ! रडगाणीं ! "

" रडगाणीं !" श्रीनिवास एकदम उसळून वात्रट स्वरांत म्हणाला, " तुला तीं रडगाणीं अन् निःश्वास वाटत असतील पण मला तीं गोड गाणीं अन् सुवास वाटतात ! अग, तें पुस्तक घरांत आलं म्हणून आज ह्या सगळ्या पुस्तकांची मिजासखोर व्यवस्था रहाते आहे ! त्या निःश्वासांनीं अक्षरशः माझ्या आयुष्याचा बगीचा फुलवला आहे, नंदनवन केलं आहे. काय समजलीस ?"

" म्हणजे काय ?" त्या अनपेक्षित व अस्थानीं वक्तृत्वाकडे आश्चर्यभरानें पहात ललिता म्हणाली.

" म्हणजे काय ? थांब; सांगतों काय तें. " श्रीनिवासनें आपली डायरी काढून पहिल्यांदा ललितेला भेटायला गेल्या दिवशींची सविस्तर नोंद ललितेच्या पुढें केली.

" वाच हें. "

ता.... ... ...

ललिता–अगदीं सर्वस्त्रीं होती तशी आहे, असं दिसायला दिसतं पण नसेल बहुधा ! किती प्रेमानें तिनं माझं स्वागत केलं ! मीच मूर्ख ! मला वाटे सुशिक्षित स्त्री ही अंतर्बाह्य पार

बदललेला एक प्राणी आहे ! आज त्या " निःश्वासा " नं शिकविलं कीं तिच्या बाह्य वागणुकींत फरक पडला असला, शिक्षणामुळें तिच्या कर्तबगारीचें क्षेत्र वाढलं असलं, तिच्यांत बंडखोर प्रवृत्ती निर्माण झाल्या असल्या तरी अजून " जून १९३३ " पर्यंत, तिच्या मूलभूत स्त्रीसुलभ भावना त्याच आहेत. फक्त त्यांच्या प्रकटीकरणाचे मार्ग बदलले आहेत ! अजून तिला आपल्या संसाराची, मुलांची, प्रेम व कौतुक करून घेण्याची हौस आहे, दुसऱ्या कुणासाठीं तरी जगण्याची आवड आहे, त्याला जरूर त्या त्यागाचीही तयारी आहे. मला तरी दुसरें काय हवें होतें ? किती उपकार मानूं त्या विभावरीचे ? उगीच नाहीं आम्हां पुरुषवर्गाला त्या पुस्तकानं एवढें वेड लावलें ! निदान मी स्वतः तरी त्या पुस्तकाच्या लोकप्रियतेचें श्रेय, त्यांतील कलागुण अगर सुशिक्षित स्त्रीजीवनासंबंधीं पुरुषाला वाटत असलेलें कुतूहल शमविण्याची पात्रता या दोन कारणांपेक्षां स्त्रीहृदयाबद्दल पुरुषांच्या मनांत विश्वास उत्पन्न करणं, ह्या गुणालाच अधिक देईन. "

ललिता रोजनिशी वाचीत असतांना तिच्या मुखावर उमटणारे विविध भाव पाहून श्रीनिवास मिस्किलपणानें हंसत होता.

" इश्श " वाचन संपतांच रोजनिशी टेबलावर टाकून, लाजून ललिता म्हणाली.

" कां, इश्श कां म्हणून ? चांगला बगीचा फुलला आहे ना ?" आपला आवडता गुलाबी बगीचा जास्तच फुलवून श्रीनिवास म्हणाला, " पहा, आहे कीं नाहीं माझ्या बागेंत कळ्यांना सुवास ?"

  

संध्याकाळीं श्रीनिवास खेळायला गेल्यावर ललितेनें पुन्हां रोजनिशी उघडली. तिच्यांतली " ती नोंद " ललिता कितीतरी वेळ पुन्हांपुन्हां वाचीत होती.

# पुण्यात्मे

वडिलांच्या पुण्याईनें चरितार्थाची फारशी विवंचना नसल्यामुळें, एम्. बी. बी. एस्. झाल्यावर मी एका सामाजिक संस्थेंत काम करण्यास सुरवात केली खरी, परंतु मला खरोखर औपचारिक समाजसेवेपेक्षां अनौपचारिक समाजसेवेचे प्रसंगच जास्त येत, व ते आवडतही. आज काय शेजारच्या मुलीला देवी आल्या, पोंचव तिला हॉस्पिटलमध्यें; उद्यां काय शेजारच्या अनाथ गंगाबाईचे विम्याचे पैसे दीर बुडवूं पाहतो, कर वकीलाच्या घरीं खेटे; असल्या किरकोळ कामांतच माझा जास्त वेळ जाई. संस्थेच्या निमित्तानें मला समाजांतल्या बऱ्यावाईट चालिरीतींचं परीक्षण करण्याचा साहजिकच प्रसंग येई, व त्यामुळें माझ्या स्वभावतःच विचारी असलेल्या मनाला अधिकच विचार करावा लागे; परंतु ज्या सामाजिक चालिरीतींचा व समाजांतील व्यक्तींच्या ज्या मनोवृत्तींचा मी नुसता दुरून अभ्यास करीत होते, त्यांचं इतक्या जिव्हाळ्यानं व आत्मीयत्वानें परीक्षण करण्याचा प्रसंग माझ्यावर येईल असं मला वाटलं तरी होतं कां?

बाबांच्या मृत्युशय्येवर धाकट्या तीन भावंडाचा संभाळ करण्याचं मी त्यांना वचन दिलं, अन् तें वचन मी प्रामाणिकपणें

पाळीत होते लहानगी मधू आणि माणिक माझ्याजवळ होतीं. मंजूचं तर बाबांनीं आपल्या सतराव्या वर्षीच लग्न करून दिलं होतं. तेव्हां तिची काळजी नव्हती. बाबांनाही मरतेवेळीं असंच वाटलं होतं, पण—

~ ~ ~

उत्तररात्र मृत्युशय्येवरच्या एका स्त्रीरोग्याला इंजेक्शन्स देण्याच्या खटपटींत घालवून पांचाच्या सुमारास मी घरीं आले व आतां अगदीं नऊ वाजेपर्यंत उठायचं नाहीं असा मनाशीं निश्चय करून निजले खरी; पण सात-साडेसातला टपालाच्या शिपायाचा आवाज ऐकून अर्धवट जागी झालेच. एकदां आपल्याला पत्र आहे असं कळल्यावर मनुष्याला पाहिल्यावांचून रहावत नाहीं! मी उठून एकदां टपाल घेतलें

आदल्या दिवशीं रविवार असल्यामुळें वेळेवर न मिळालेलें तें बडोद्याचें पत्र होतें. बडोद्याचा छाप पाहून मला अगदीं आनंद झाला, कारण फार दिवसांत मंजूकडून खुशाली कळली नव्हती. अर्धवट लाडक्या स्वरांत छोट्या माणिकला "माणक्या, मंजूआक्काचे पत्‌ऱ आलय्‌ बघ" असं म्हणत मी पत्र फोडलं.

हस्ताक्षर मंजूचेंही नव्हतें, आनंदरावांचेंही नव्हतें; मी चकितच झाले! बडोद्यास रहाणाऱ्या वडिलांच्या ओळखीच्या एका गृहस्थांनीं-श्रीधरपंतांनीं-तें पत्र लिहिलें होतें.

तें पत्र मी शेवटपर्यंत कसें वाचलें असेल-एकट्या परमेश्वराला माहीत! क्षणभर आपण स्वप्नांत आहों अगर आपला मेंदू बधिर झाला आहे असा मला भास झाला! त्या पत्रांतली बातमीच तितकी दुष्ट होती! आनंदरावांनी ७-८ दिवसांपूर्वी मुंबईस जाऊन एका परजातीच्या ग्रॅज्युएट कुमारिकेशीं लग्न केलें होतें!

हातांत पत्र घेऊन मी मनसोक्त रडले; पाठच्या बहिणीच्या

संसाराची होळी झाली, तें अपमानास्पद दुःख कुणाला अन् कसं सांगायचं? बिचारीं मधू-माणिक भांबावूनच दूर उभीं राहिलीं; त्यांना काय कळणार?

आणि दुःखाचा भर जरा कमी होतांच मी संतापाच्या आहारीं गेले! मला वाटलं, वडील गेले, तेव्हां आनंदरावांना आतां असं वाटलं असेल कीं मंजूच्या बाजूनें आपल्याला जबाब विचारणारं कोणी नाहीं, तेव्हां सारें क्षेत्र मोकळं झालं; पण मी आहे ना? मी शिकलेली आहे. झाली गोष्ट परत येत नाहीं तरी पण आनंदरावांचा पाठपुरावा केल्यावांचून मी सोडणार नाहीं!

खिडकींतून बाहेर पहात मी स्वस्थ उभी राहिले. माझ्या डोळ्यांपुढून मंजूच्या दुर्दैवी आयुष्याचा चित्रपट जात होता. सहा वर्षांपूर्वी वडिलांनीं तिला किती भरंवशानें आनंदरावांच्या स्वाधीन केली! मंजू सारी १६-१७ वर्षांची होती. आनंदराव पंचवीस वर्षांचे होते. ते मंजूला पहायला आले होते. मंजू सुंदर होती तेव्हां पसंतीचा प्रश्नच नव्हता, व इंग्रजी पांचवींत असल्यामुळें शिक्षणाचाही प्रश्न नव्हता; त्यांनीं ताबडतोब होकार दिला व लग्न झालें.

आनंदरावांच्या स्वभावाचें मी सार्‍यांच्याजवळ किती कौतुक केलं होतं!

दोन वर्षांपूर्वी आनंदराव पुण्यास आले तेव्हांच, कां कोण जाणे, पण त्यांच्या आयुष्यांत कसली तरी जबरदस्त अस्वस्थता निर्माण झाल्याची मला शंका आली होती! तरीही त्याचे परिणाम इतक्या दूरवर जातील असं मला वाटलं नाहीं! त्या पत्रानें मला धबकाच बसला!

आतां माझा पहिला विचार अर्थात् बडोद्यास जाऊन मंजूला पुण्यास आणण्याचा होता, व मधू-माणिकची दोन दिवस माझ्या-

वांचून रहाण्याची व्यवस्था करून मी त्याच दिवशीं बडोद्यास निघाले

• ~ ~ ~

बडोद्यास मी श्रीधरपंतांच्याच घरीं उतरलें. कारण आतां आनंदरावांच्या घरीं उतरायला मला चमत्कारिक व अपमानास्पद वाटत होतें. घरीं पोंचायला मला सकाळीं साडेदहा वाजले. श्रीधरपंतांच्या घरींही अडचणच होती. सतरा-अठरा वर्षांची सर्वांत मोठी मुलगी नुकतीच लग्न होऊन घरीं गेलेली. तिच्या पाठीवर सहा मुलगे, परंतु ते मुलगे म्हणून घरकामांतून अलिप्त. लक्ष्मी-बाई अलीकडे अनैमिक झाल्यामुळें घरकामाच्या देखरेखीचा सर्व बोजा त्यांच्या पंचवीस वर्षांच्या विधवा नणंदेवर पडला होता. माईआत्या उभा दिवस कामांत बुडलेली असे.

मी टांग्यांतून उतरून चहा वगैरे घ्यायला सुरवात करते तोंच श्रीधरपंतांनीं अर्थात् आनंदरावांच्या निषेधाला सुरुवात केली. "कोवळी बावीस वर्षांची पोर, तिच्या जन्माचं मातेरं केलं ह्या हलकटानं! कां तर त्याचं म्हणे त्या मुलीवर प्रेम बसलं! जशा कांहीं ब्राह्मणांत प्रेमाला लायक मुलीच नाहींत! अहो, हें रोमँटीक प्रेम वगैरे रागळं झूट आहे. माझें तर अगदीं प्रामाणिक मत झालंय कीं हा आनंदराव म्हणजे शुद्ध सैतान आहे! मनःपूत वागण्याकरतां हे लोक विकारवशतेलाच प्रेम म्हणतात! पशू शिंचे!"

श्रीधरपंतांचा शब्दन् शब्द जणूं काय अंतःकरणांतून कळवळून बाहेर पडला होता! मंजूच्या प्रेमानें मोहवश झालेल्या मला सुद्धां भास झाला कीं माझ्या भोंवतालच्या जगांत खरा सैतान जर कुणी असेल तर ते एकटे आनंदराव! आठाच्या सुमाराला श्रीधरपंतांचे वकील जांवई घरीं आले. पुन्हां त्याच गोष्टी निघाल्या. जांवई अगदीं अपटुडेट सुशिक्षित व मधुभाषी होते. वर्षापूर्वी

त्यांची प्रथम पत्नी दोन अपत्यांना मागें ठेवून गेली, व त्यानंतर दोनच महिन्यांनीं श्रीधरपंतांच्या अत्याग्रहावरून त्यांनीं कमळीला पदरांत घेतली.

जांवयांना तर श्रीधरपंतांच्याहीपेक्षां जास्त चीड आलेली दिसली! त्यांचा कटाक्ष मिश्रविवाहावर नव्हता. कारण ते साहेबी सूट पेहरणारे सुधारक होते! त्यांचा कटाक्ष एकच कीं एका आत्म्याच्या सुखाची आनंदरावांनीं राखरांगोळी केली! हातांतील गरम चहाच्या कपांतून निघणाऱ्या वाफेकडे विचारपूर्वक पहात विनायकराव म्हणाले, "प्रेम झूट असं मला वाटत नाहीं पण सुशिक्षित म्हणविणाऱ्यांच्या अशा कृतीनं सुधारणेच्या चालत्या गाड्याला खीळ पडते-लोकांचीं मनें अकारण कलुषित होतात!"

वकिलांची विचारसरणी मला पटली. कारण ती पटण्यासारखीच होती. त्यांच्या उद्गारावरून मला त्यांच्याबद्दल आदर वाटला. आम्ही तिघांनींही एकमतानें आनंदरावांचा कसून निषेध केला!

  

थोड्या वेळानें मी आनंदरावांच्या घरीं गेले. रस्ताभर डोक्यांत चाललेला विचारांचा कोलाहल माझा मला सुद्धां सहन होईना! पायऱ्या चढून मी आंत गेले. आनंदराव व सुधा —सुधा कसली, मंजूच्या जीवनामृतांत जहर ओतणारी ती विषवल्ली! —दिवाणखान्यांतच होते. मुंबईहून आल्याला त्यांनाही थोडेच दिवस झाले होते. मला पाहतांच आनंदरावांना अपराध्यासारखें वाटलें कीं काय असा मला भास झाला. परंतु त्यांनीं तें दिसूं न देण्याचा प्रयत्न केला! सुधेनेंच मला 'या बसा,' वगैरे म्हटलें. तिला पाहिल्याबरोबर माझ्या डोळ्यांत पाणी आलं, काय बोलावं तें सुचेना! त्या दोघांचीही चमत्कारिक अवस्था झाली होती!

सर्वत्र स्तब्ध ! अखेर शक्य तोंवर मन आंवरून मीच आनंदरावांना जरा घोगऱ्या आवाजांत म्हणाले, " मंजू कुठें आहे ? "

पण उत्तरही सुधेनेंच दिलें, " आंत आहेत त्या. या ना आंत. "

मी मुकाट्यानें तिच्या पाठोपाठ आंत गेले. एका खोलींत मंजू एकटीच कांहीं वाचीत बसली होती. " ताई आल्या आहेत ना. " सुधा मंजूला उद्देशून म्हणाली. मंजूनें वळून नुसतें माझ्याकडे पाहिलें ! अल्लड, पोरकट व भोळया मंजूच्या चेहेऱ्यावर मला गंभीरपणाची छटा दिसली.

सुधा परत गेली. आनंदरावांच्या लग्नाचा उल्लेखच न करतां मी म्हणाले, " मंजू, मी तुला न्यायला आले आहे. आज रात्रीच्याच गाडीनं आपण जाऊं. "

आतां मात्र मंजूला एकदम रडूं कोसळलें ! मला एकदम मिठीच मारून ती म्हणाली, " कशाला ताई ! उगीच तुला मात्र काळजी. " " हो, पण तूं इथें राहिलीस तरी मला काळजी नाहीं कां वाटणार ? " मी जास्त बोललेच नाहीं. त्या दुर्दैवी जीवाची समजूत कोणत्या शब्दानें घालूं ? मी तिला " रात्रीच्या गाडीनें निघायची तयारी कर " असें शेवटचेंच सांगितलें.

मी थोडा वेळ तिच्याजवळ बसले परंतु आम्ही फारसं बोललों नाहीं. मी तशीच परत यायला निघणार होते. आनंदरावांचा निरोप घेऊं नये, फार काय मंजूनेंही त्यांना न कळवितां स्टेशनचा रस्ता धरावा असं मला वाटलं; पण मी उठते तोंच सुधा मला पुन्हां बोलवायला आली ! परत दिवाणखान्यांत येते तों टीपॉयवर चहा !-खरोखर त्या चहाचा सुद्धां मला तिटकारा वाटला ! परंतु आतां तिथं फार्स करण्यांत अर्थ नव्हता. मी मुकाट्यानें

एका खुर्चीवर बसले. समोरच आनंदराव होते. सुधा निघून गेली.

" केव्हां आलांत ? " आनंदरावांनीं अखेर त्या स्तब्धतेला वाचा फोडली.

" सकाळींच. रात्रीं परत जाणार आहे मंजूला घेऊन." मी तुटकपणानें म्हणाले. आनंदराव एकदम थांबले. " रात्रीं जातांना इकडेच गाडी घेऊन येईन ! " कांहीं तरी बोलायचें म्हणून मी बोलले.

" असं कशाला ? वाटल्यास असं करा, तुम्ही परस्पर जा. मी इकडून तिला घेऊन येईन स्टेशनवर. "

आपला राग कोणत्या शब्दांत व्यक्त करावा तें न कळल्यामुळें मी नुसतेंच ' बरं ' म्हणाले, पण चहा घेतला नाहीं !

मी जायला निघाले. सुधा पुन्हां मला बागेच्या फाटकापर्यंत पोंचवायला आली ! माझ्या मनःस्थितीची तिला कल्पना असावी तेवढ्या वेळांत. तिनें किती तरी प्रश्न विचारले. कुठं उतरला आहांत ? इथें कां नाहीं उतरलांत ? खरं हें घर तुमच्या बहिणीचंच आहे ! अशी किती तरी प्रकारची गोड भाषा सुधा बोलली !

मी श्रीधरपंतांच्या घरीं उतरले आहे हें सांगितल्यावर मात्र सुधा एकदम चपापली, गंभीर झाली ! ' श्रीधरपंत म्हणजे त्या वकिलांचे सासरे ना ? " तिनें एकदम प्रश्न केला. परंतु तिच्या प्रश्नाकडे माझें फारसें लक्ष नव्हतें.

मी परत आले कां कोण जाणे, पण मंजूच्या दुर्दैवाचं कारण ही गोष्ट वगळली तर एकंदरींतच ती हुषार गुणी मुलगी असावी असं वाटलं – बिचारी मंजू !

संध्याकाळीं माझ्याभोंवतीं पुन्हां सगळयांनीं गराडा घातला.

त्या ' सैताना'च्या घरची हकीकत ऐकायला सारेच कान उत्सुक होते. परंतु तिथें कांहीं विशेष हकीकत घडलीच नव्हती तर मी तरी काय सांगणार? श्रीधरपंत, विनायकराव, कमळी सगळ्यांनींच मला प्रश्न विचारून विचारून भंडावून सोडले! सकाळच्याच निषेधसभेची पुनरावृत्ति झाली! पुन्हां एकवार श्रीधरपंत ' पशूंचे ' म्हणाले, पुन्हां वकिलांनीं "एका आत्म्याची, आणि समाजसुधारणेच्या खिळी"ची पुनरावृत्ति केली! बिचाऱ्या माई-आत्याला घरकामाखालीं, व लक्ष्मीबाईंना दुखण्याखालीं प्रश्न विचारण्यालाही सवड नव्हती!

रात्रीं मला पोंचवायला वकीलसाहेब आपण होऊनच सहकुटुंब स्टेशनवर आले. आनंदरावही मंजूला घेऊन आले. वकील मधून मधून पत्नीच्या कांहीं काव्यात्म थट्टा वगैरे करीत, आनंदराव नुसते त्यांच्याकडे रोखून पहात, परंतु ते एकमेकांशीं बोलले नाहींत! जातांना किती तरी वेळ आनंदराव व मंजू हळूहळू कांहीं तरी बोलत होते, व वकील त्या कुजबुजण्याकडे कुत्सित दृष्टीनें पहात होते!

  

आम्हीं पुण्यास आलों. मंजूनं शिकायला सुरवात केली. परंतु अर्ध्या वाटेवरून संसाराकडे पाठ फिरविलेली मंजू, तिचं शिकण्याकडे लक्ष कसं लागणार? लवकर शिकण्यांतून मोकळें होण्याच्या दृष्टीनें मी तिला ससूनमध्यें सुईणपणाचा कोर्स घेऊन दिला. एक वर्षांतच मंजूचा अभ्यासक्रम संपून ती मोकळी व मिळवतीही झाली.

आतां तर मला मंजूचा अधिकच विचार पडला! २३।२४ वर्षांचें तरुण वय. संसाराचा पाश नाहीं, प्रेमाला आधार नाहीं, बुद्धीला वळण नाहीं! आयुष्याचा या पुढचा प्रवास तिला

खडतर होणार हें मला स्पष्ट दिसत होतें.

आनंदराव तिला केव्हां पत्र पाठवीत, केव्हां पैसे पाठवीत; पण मीच ठेऊन घेत नसे. मला वाटे, मी समर्थ आहे तोंही समर्थ आहे! द्यायचं तें प्रेम दिलें नाहीं आतां पैशाला काय किंमत? आनंदराव केव्हां केव्हां तिला बडोद्यासही बोलावीत, पण मलाच ती कल्पना आवडत नसे. मंजू अर्थात् माझ्या इच्छेविरुद्ध जाण्याचें धाडस कुठून करणार?

मंजूला स्वभावतःच संसाराची आवड होती. कुठं हौसेनं मधू-माणिकचे तऱ्हेतऱ्हेचे कपडे शीव, कुठें तऱ्हेतऱ्हेचीं भांडीं बोहारणी-कडून घे, ह्या गोष्टी तिला वाचनापेक्षां अधिक प्रिय! तिचा हा संसाराकडचा ओढा पाहूनच मला जास्त वाईट वाटे! तिच्या प्रेमळ वृत्ती जों जों प्रभावी होत, तों तों "ह्या दुर्दैवी मुलीच्या नशिबीं दुसऱ्याचे संसार आपुलकीनें करण्याची पाळी आनंदरावांनीं आणली" अशी कल्पना येऊन मला अगदीं संताप येई! मंजू जरी मोठी बुद्धिमती नसली तरी आपल्यावर प्रेम करणाऱ्याचें आयुष्य सुखी करण्याइतका व्यवहारी शहाणपणा तिच्यांत खास होता. रूपानेंही ती सुंदर होती. परंतु आमच्या लग्नपद्धतीमुळें तिचें दैव आनंद-रावांच्या लहरीबरोबर निगडित केलें होतें.

असे अर्धवट विचार माझ्या मनांत यायला आणि अगदीं अनपेक्षित रीतीनें विनायकरावांचें अगत्यानें पत्र यायला एकच गांठ पडली. बडोद्यांत घटस्फोटाचा कायदा पास होणार असल्याची बातमी विनायकरावांनीं कळवली होती.

अलीकडे माझं तिकडेच लक्ष लागलें होतें. वास्तविक माझ्या संस्थेसमोर समाजसेवेचीं अनेक ध्येयें होतीं, परंतु ज्या बंधनांचे दुष्परिणाम आपल्याला प्रत्यहीं दिसतात—नव्हे जाणवतात—तीं तोडण्याच्या सुधारणांचे विचार आपल्या डोक्यांत साहजिकच जास्त

येतात. आतां माझे बडोद्याच्या पास होऊं घातलेल्या कायद्याकडे अगदीं डोळे लागले होते. कारण आनंदराव बडोद्याचे रहिवाशी, तेव्हां त्या कायद्याचा फायदा मंजूला सहज मिळण्यासारखा होता.

पण मला फार दिवस वाट पहावी लागली नाहीं. पुन्हां बिचाऱ्या विनायकरावांनीं आपण होऊनच तो कायदा पास झाल्याची बातमी मला तावडतोब कळवली.

यापुढचा प्रश्न मंजूच्या इच्छेचा होता. ती माझे ऐकत असे; तरी इतक्या जिव्हाळयाच्या वैयक्तिक प्रश्नाबाबत तिचीं मतें हींच अधिक महत्त्वाचीं होतीं. तरी पण माझे विचार मी तिच्या कानावर घातलेच. तिची आकलनशक्तीच बेताची होती. जगांत मनुष्याला सुखाकरतां धडपड करण्याचा हक्क असतां एकट्या मंजूला कां नसावा, या प्रश्नाचा खोल अर्थ कळणें हीच गोष्ट तिला कठीण होती! कांहीं दिवस मी गप्प बसून तिला तयार करण्याचाच प्रयत्न करीत होते.

विनायकरावांनींही हीच सूचना माझ्यापुढें विचाराकरतां मांडली. खरी अडचण काय ती मी त्यांना कळवली. परंतु पुन्हां त्यांचें पत्र आलें कीं, "मंजुळाबाई जरी फार शिकलेल्या नसल्या तरी अगदीच कांहीं अडाणी नाहींत. शिवाय त्या तुमची आज्ञाही मोडणार नाहींत. तेव्हां या बाबतींत त्यांचें मन तयार करण्याची तुमच्यावरच जबाबदारी आहे. स्त्रियांनींच या बाबतींत पुढें पाऊल टाकण्याचा अट्टाहास धरला पाहिजे, नाहींतर कायदे पास होण्याचा उपयोग तरी काय? कुणी तरी एकानें पहिल्यानें एकादी गोष्ट केलीच पाहिजे—वगैरे वगैरे." कोर्टांत आमच्यातर्फे काम चालवण्यासही विनायकराव तयार होते.

अखेर या बाबतींत आनंदरावांचें काय म्हणणें आहे तें ऐकून घ्यावें व प्रत्यक्ष विनायकरावांना भेटून पुढच्या गोष्टी

ठरवाव्या म्हणून समजुतीनें मंजूची अनुमति घेऊन मी बडोद्यास जाण्याचें ठरविलें.

~ ~ ~

पुन्हां अर्थात् मी श्रीधरपंतांच्याच घरीं उतरलें. ॲनेमिक लक्ष्मीबाई बाळंतीण होत्या. मी त्यांच्या समाचाराला बाळंतिणीच्या खोलींत जाऊन बसले. रीतिप्रमाणें मंजूच्या दुर्दैवाबद्दल दुःख करून लक्ष्मीबाई म्हणाल्या, "सगळं अनकूल असून नाहींसं झालं बिचारीला." "हो," मीही सहजच म्हणाले, "एखादं बाळ असतं तर तेवढा तरी विरंगुळा झाला असता बिचारीला."

"हंः बरं झालं; सुटली एक जन्म!" लहानसा उसासा सोडून लक्ष्मीबाई म्हणाल्या. मला धक्काच बसला! पैसेवाल्या नवऱ्याची लाडकी बायको, अष्टपुत्रांची माता असलेल्या भाग्यशाली (!) सुवासिनीचा तो सुस्कारा होता! मातृपदाची तहान लागलेल्या मंजूच्या दीर्घ सुस्काऱ्यापेक्षां लक्ष्मीबाईचा लहान सुस्कारा कितीतरी पटीनें जास्त भेदक होता!!

संस्थेच्या ऑफिसमध्यें बसून समाजसुधारणेला कोणता कायदा अवश्य आहे याचा विचार करणाऱ्या मला समाजाचं सत्यस्वरूप समोर दिसत होतें! धर्माच्या संमतीनें भूतदयेची वारांगुळी लावलेले श्रीधरपंत आंत येऊन बाळाकडे पाहून मला हंसून म्हणाले, "हें आमचं नवं रत्नं!" माझ्या अंगावर शहारेच आले!

~ ~ ~

दुपारीं मी विनायकरावांशीं त्या लग्ननिश्चयाच्या कायद्याबाबत चर्चा केली. विनायकराव मला मदत करण्यास अगदीं आनंदानें तयार होते. मंजूला मी तयार केली होती. कायदा तयार होता. आतां सुरळीतपणें सर्व गोष्टी पार पडण्यास फक्त आनंदरावांची संमति पाहिजे होती.

सरळ आनंदरावांकडे जाऊन मी त्यांना माझ्या येण्याचा हेतु सांगितला. आनंदराव खूपच विचारग्रस्त झाल्यासारखे दिसले! अखेर कांहीं तरी निश्चय करून ते म्हणाले, " ताई, आतां मी कांहीं बोललों तर तुम्हांला वाईट वाटेल अशा मनःस्थितींत तुम्ही दिसताहां! पण हा विचार तुमच्या मनांत कशावरून आला? " त्यांना कसला तरी संशय आलेला दिसला.

" पण तुम्ही कधीं दुसऱ्याच्या वाईट वाटण्याची कल्पना केली आहांत? " मी रागाच्या भरांत म्हणाले. परंतु माझ्याकडे लक्ष न देण्याचा आनंदरावांनीं जणूं काय संकल्पच केला होता! पुन्हां ते म्हणाले, ' मला नाहीं वाटत यांत कांहीं फायदा आहे असें! "

तापलेली सळई कानांत घालावी असा मला भास झाला! आपल्या सुखाच्या वेळीं तिच्याकडे लक्ष दिलं नाहीं आणि आतां तिच्या सुखाच्या आड येताहेत! संतापामुळें डोळयांत येऊं म्हणणारा अश्रूंचा कढ आंवरून मी म्हणाले, " बरोबर आहे, तुमचा फायदा नाहींच उलट तोटाच आहे. कारण आजच्या समाजांत तो तुमच्या अब्रूला कमीपणा आहे! आनंदराव, एका जिवाचा जिवंत बळी घेतलांत, आतां त्याला अन्य तऱ्हेनें सुख मिळेल तर तेंही मिळूं देऊं नका! किती पापी आहांत! "

बोलतां बोलतां माझ्या डोळयांत अश्रू आलेच!

माझी स्थिति पाहून त्यांनाही वाईट वाटलं कीं काय कोण जाणे! माझ्याकडे रोखून पहात, किंचित् हलक्या परंतु जोरदार आवाजांत ते म्हणाले, " खरेंच आहे; मी शतवार पापी आहे —मात्र मंजूला विभक्त करण्याचा सल्ला देणाऱ्या तुमच्या वकील-हितचिंतकापेक्षां जास्त पापी खास नाहीं. "

" म्हणजे? " मी जरा दचकूनच त्यांच्याकडे पहात

म्हणाले.

माझी ऐकून घेण्याची वृत्ति पाहून आनंदरावांना जरासा धीर दिसला ! मृदुस्वरांत ते पुन्हां म्हणाले, " ताई, मंजू विभक्त झाली तर त्यांच्या मनासारखें होईल एवढं खरं; कारण जगाच्या उपहासाला मी जरा जास्त पात्र होईन ! पण पुढें तिला खरेंच सुख लागेल अगर नाहीं, याचा विचार तुम्ही नको कां करायला ? "

मी जास्तच विचारांत पडले. " म्हणजे काय ? तुम्हांला उपहासाला पात्र करण्याकरतां कां ते मला सल्ला देताहेत ? त्यांना काय करायचं आहे तुमच्याशीं ? "

" मग कोणाशीं करायचें त्यांना ? " उपहासानें हंसून आनंदराव म्हणाले. " सगळ्या जगांत जर त्यांना कुणाशीं करायचं असेल तर तें माझ्याशींच होय ना सुधा ? "

नुकत्याच दिवाणखान्यांत आलेल्या, व आमच्या भांडणाकडे ओशाळ्या मुद्रेनें पहाणाऱ्या सुधेकडे आनंदरावांनीं वळून पाहिलें.

मला थोडंसं गौडबंगाल वाटलं.

" तसं कांहीं विशेष नाहीं ताई, पण जगांत जी वस्तु विनायकरावांना हवी होती ती मी मिळवली अन् त्याचा सूड आतां वकील अशा रीतीनें काढताहेत. जा बरं सुधा, तुझ्याकडे असतील थोडीफार तीं वकिलांचीं पत्रं तरी घेऊन ये. "

सुधा खरेंच गेली व दोन-चार पत्रं घेऊन आली ! आनंदरावांनीं मला सगळी हकीकत सांगितली. वकिलांच्या पहिल्या लग्नापूर्वी त्यांची व सुधेची ओळख होती. सुधा सुंदर, हुषार व सुस्वभावी होती पण ब्राह्मण नव्हती ! वकिलांनीं तिच्यावर मनःपूर्वक प्रेम केलं, व दोन तीन वर्षे तिला लग्नाच्या आशेवर गुंगवून शेवटीं एका ब्राह्मणकन्येलाच पदरांत घेतली व तीही गेल्यावर श्रीधरपंतांच्या कमळीला भाग्यपदाला चढविली !

" ही तुमच्या सल्लागारांची समाजहिताची कळकळ आहे ! नुसते प्रेमाला जागले असते तरी मिश्रविवाहाचं पुण्य पदरांत पडलं असतं, पण त्याकरितां थोडंफार तरी समाजाच्या विरुद्ध जावं लागलं असतं ना ? तें ह्या समाजहितचिंतकांनीं कसं करावं ? आणि दुसऱ्या लग्नाच्या वेळेस ओळखीच्या कुटुंबांतली १८ वर्षांची कमळी त्यांना दिसली पण त्याच घरांत वावरणारी त्यांना सर्वस्वीं अनुरूप अशी २५ वर्षांची माईआत्या दिसली नाहीं; अशी ही तुमच्या सल्लागारांची जिवाला काडीमात्र घस लागूं न देणारी व फक्त कायद्यांचा पाठपुरावा करणारी समाजसेवा आहे ! "

गोष्ट खरी होती !

थोड्या शांत डोक्यानें मी आनंदरावांशीं रात्रीपर्यंत चर्चा केली. ते एकच म्हणत, " जरूर पडेल तेव्हां घटस्फोट अवश्य देईन; पण मंजू जर पुन्हां लग्न करणार असेल तरच त्यांत अर्थ. नाहींतर एर्वीतेवीं माझा तिला काय त्रास आहे ? उलट माझ्यावर थोडी फार नैतिक जबाबदारी आहे तीही नाहींशी होईल. तिच्याशीं लग्न करायला तयार असलेला तरुण अगोदर दाखवा म्हणजे घटस्फोट देतों. "

विषण्ण मनानें मी परत आले. आनंदरावांच्या बोलण्यांत खरंच अर्थ होता !

  

मी पुण्यास परत आले. माझ्या दृष्टीनं जेव्हां मंजूच्या आयुष्याचा व त्यांतील सुखाचा प्रश्न पुढें आ वासून उभा राहिला होता, तेव्हांच लोकांच्या दृष्टीनं तो सुटला होता. कारण ती आतां मिळवती होती ! निदान बोलतांना सर्वजण अशा दृष्टीनं बोलत कीं, आतां तिच्या आयुष्याचा मार्ग हा निश्चित ठरला !

मला कळेना कीं हे लोक वेडे आहेत कां भोंदू आहेत ?

आतां मी सामाजिक मनोवृत्तीचा ठाव घेण्यापेक्षां तिचा अंतच पहाण्याचें ठरवलें ! सुधेच्या लग्नाच्या वेळीं आनंदरावांना निषेध केलेल्या दोन लग्नेच्छु तरुणांना मी माझा प्रश्न सरळ विचारला पण माझ्या पदरांत निराळेंच माप पडलें ! थोड्याच दिवसांत ' सवाष्ण बहिणीला स्थळें पहाणारी डॉक्टरीण ' या कुत्सितपणानें दिलेल्या बहुमानाच्या पदवीला मीच पात्र झालें ! दोन वर्षांपूर्वीच्या सभांतील वीरश्रीयुक्त वाक्यें मला आठवलीं-" कायद्यांत सुधारणा पाहिजे. "

" कशाला हे लोक कायद्यांत सुधारणांचा अट्टाहास करतात ? " मी मनांत म्हणालें. " कायदे पास होतात तों तों मनुष्याच्या मनोवृत्ती कसोटीला लागण्याचा प्रसंग येतो, त्यापेक्षां राक्षसी कायदे आहेत तेच ठीक, म्हणजे आपल्या, दुरूनच गंमत पहाणाऱ्या नादान वृत्तींना, कायद्याच्या नांवाखालीं लपायला तरी सांपडतें ! "

माझ्या पांच वर्षांच्या समाजसेवेंतून व एका दुःखद अनुभवांतून मी एकच सार काढलं कीं, आमच्यांत सुधारणा होत नाहीं हा कायद्याच्या दोषापेक्षां आमच्या पापपुण्याच्या विकृत कल्पनांचा दोष आहे ! आमच्या शिष्ट समाजघटकांच्या मनोवृत्ती एखाद्या अनिष्ट ' कृती 'चा निषेध करतांना तरुणाच्या भावमयतेनें उचंबळतात, त्याच इष्ट सुधारणेचा मार्ग लांब अंतरावरून पहातांना स्थितप्रज्ञांची उदासीनता धारण करतात ! आनंदरावांचा निषेध विनायकराव करूं शकतात कारण त्यांचें पापाचरण प्रत्यक्ष कृतिरूप नाहीं ! मंजूच्या यातनांच्या जबाबदारीबद्दल आम्ही आनंदरावांचा निषेध करतों, लक्ष्मीबाईच्या जिवंत मृत्यूबद्दल श्रीधरपंतांचा करीत नाहीं ! आणि दोनच वर्षांपूर्वी आनंदरावांचा निषेध करून आज मजूला नाकारणाऱ्यांचा त्याहून करीत नाहीं !

दोन वर्षांपूर्वी मंजूच्या दुःखाला आनंदराव प्रत्यक्ष कारण होते असं पाहून त्यांचा रागाच्या भरांत निषेध करतांना जगाचं सत्यस्वरूप मला दिसलंच नाहीं !

  

छोट्या माणिकला बोटांत धरून मंजू बाहेरून आंत आली. माझ्या चित्तवृत्ती जणूं काय एकदम उचंबळून आल्या ! निष्पाप निरपराध मुलगी !

"वेड मंजू !" मी मनांत म्हणाले. "भूतदयेचं अधिष्ठान सोडलेल्या धर्मकल्पना, आणि निषेधांत विराम पावणाऱ्या, सुधारणेच्या निर्जीव, निष्क्रिय वल्गना, अशा दुहेरी पेचांत आंतून-बाहेरून कुजलेल्या समाजांत, स्त्रीजातींत जन्म घेतलास ! आतां सुखाच्या आशेवर पाणी सोडशील तर त्यांतच तुला जास्त सुख लाभेल."

आनंदरावांच्या निषेधाचा कहर उसळला होता तेव्हां प्रेमानें मोहवश झालेल्या माझ्या मनाला आनंदरावांच्या कृष्णकृत्याच्या भूमिकेवर बाकी सगळेच पुण्यात्मे दिसत होते आणि त्यांनींही तसाच अभिनिवेश आणला होता ! आज त्या लोकांचें सत्यस्वरूप पहातांना वाटते कीं, मंजूच्या सुखाची होळी करून तें माप प्रामाणिकपणें सरळ पदरांत घेणारे एकटे आनंदराव सैतान, कां अनुरूप मुलीवर प्रेम करून, तिला सुखाची आशा दाखवून, त्या प्रेमाचा आदर करण्याची हिंमत नसलेले व १८ वर्षांची मोठाड कमळी भेटली या सबबीवर, माईआत्याबद्दल दुरून सहानुभूति दाखवून, समाजांतील मान्यतेचें पद अढळ राखलेले विनायकराव सैतान ? लाडक्या पत्नीला यातना भोगायला लावून पाठच्या बहिणीकडून संसाराचा गाडा परस्पर चालवून घेणारे श्रीधरपंत सैतान कां तोंडाची वाफ दवडून कृतीच्या वेळेला माघार खाणारे

तरुण जयंत–प्रभाकर सैतान?

  

त्याचा परिणाम मात्र एकच झाला आहे; निषेध या शब्दाचीच मला शिसारी आली आहे! निषेधकांची स्वतःची भूमिका शोधायला गेलं तर--तर—जाऊं द्या, कोळसा उगाळावा तितका काळा!

# लढाईचा शेवट

आमच्या गाडीला अजून जवळ जवळ दीड तास अवकाश होता. म्हणून मी व पद्मावती मुरादाबादच्या स्टेशनवर येणाऱ्या जाणाऱ्या इतर गाड्यांची गंमत पहात फिरत होतों. रात्रीं आठ वाजतांची वेळ. गाडीची वेळ झाली होती. इतक्या परमुलुखांत सहजच मनुष्याला, येणाऱ्या गाडीनें कोणी तरी महाराष्ट्रीय येतील कां अशी कुतूहलपूर्वक अपेक्षा वाटते. तसंच आम्हांलाहि वाटत होतं. गाडी धाड धाड करीत स्टेशनांत आली. डोळ्यांसमोरून जाणाऱ्या प्रत्येक डब्याकडे आम्ही लक्षपूर्वक पहात होतों, पण मला एकही ओळखीचा चेहरा दिसला नाही. नाही म्हणायला एक दक्षिणी बाई व सुमारें सहा-सात वर्षांची एक मुलगी एका खिडकींतून बाहेर पाहताहे असं वाटलं म्हणून मी लक्षपूर्वक पाहणार तोंच तो डबा आमच्या पुढून झपाट्यानें जाऊन आमच्या डाव्या हाताला थोड्या अंतरावर पोंचला व गाडी थांबली. पद्मावतीचीही दृष्टी त्याच डब्याकडे लागली होती, पण एक-दोनच सेकंद. एकदम "अगबाई, इंदिराबाई!" असं अर्धवट म्हणून तिनें त्या डब्याच्या बाजूला चालायला सुरुवात केली. त्या बाई माझ्या ओळखीच्या नव्हत्या म्हणून मी थोड्या अंतरावरच उभी राहून

त्यांच्याकडे पहात होते. प्रथमदर्शनीं एकच गोष्ट माझ्या ध्यानांत आली कीं, इंदिराबाई अतिशय सुंदर होत्या. दिव्याच्या उजेडांत मला त्यांच्या चेहऱ्याची फक्त डावी बाजू दिसत होती. पण त्यामुळें त्यांच्या चेहऱ्याच्या ठेवणीचा रेखीवपणा जास्त कळत होता सतेज गोरा वर्ण, कमानदार भुंवया, प्रवासामुळें किंचित् उसक-टलेला काळयाभोर केसांचा अंबाडा आणि वात्सल्यभरानें त्या छोट्या छोकरीकडे लागलेली दृष्टि. त्यांच्या व पद्मावतीच्या एकंदर आविर्भावावरून त्यांच्या बोलण्याचा विषय ती मुलगी होती हे सहज कळण्यासारखें होतें. ती मुलगी खिडकींतून डोकावून स्टेशनवरची गंमत पाहण्याचा प्रयत्न करीत होती आणि ती आई तिला आंवरण्याच्या खटपटींत होती. मी किंचित् पुढें झाले. इंदिराबाईनीं केलेल्या मुलीच्या वर्णनाचं एकच वाक्य मी ऐकलं, " पाहिलंत ना पद्माबाई, सारखी धडपड. आतां स्टेशनवरची गडबड तरी आहे, पण बाकीच्या वेळेलासुद्धां अशी खिडकींतून अंधारांतच बाहेर पहात बसते अन् मग तिच्याबरोबर मला जाग्रण. " पण माझं लक्ष मुलीच्या कौतुकापेक्षां आईच्या सौंदर्याकडेच जास्त होतं. माझ्याकडे अर्धवट वळलेल्या त्या सुंदर चेहऱ्याकडे पाहून मला कविजनांनीं वर्णिलेल्या अष्टमीच्या चंद्राची आठवण झाली. पण अष्टमीचा चंद्र 'कविजनांच्या कल्पनेला चेतविण्या' इतका आल्हाददायक असला तरी त्यामुळें पौर्णिमेच्या पूर्णचंद्राला पाहण्याचं कुतूहल कमी होतं कां ? अगदीं सहजच मी त्यांच्याजवळ जाणार इतक्यांत माझ्याकडे लक्ष जाऊन एकदम पद्मा मला म्हणते, " जा, कृष्णा, पळत जाऊन कांहीं तरी खाऊं घेऊन ये बेबीला. "

मी खाऊं घेऊन परत आले, तरी बेबीचें कौतुक हा त्यांचा बोलण्याचा विषय बदलला नव्हता. मी इंदिराबाईंच्या समोर उभी राहिले. माझ्या अपेक्षीं मनाला थोडाफार धक्का

बसला. त्यांच्या उजव्या डोळयाची सपशेल खांच झाली होती! पूर्णचंद्राची अपेक्षा करतांना ग्रहणाचा डाग दिसल्यावर वाईट वाटावं तसं मला वाटलं.

पद्मावतीनं बेबीला खाऊं दिला. कौतुकानं तिच्या गालाला हात लावला. आपल्या अपत्याचं लोकांनीं केलेलं कौतुक पाहतांना आईच्या चेहऱ्यावर उमटावा तो गोड मनोभाव इंदिराबाईंच्या चेहऱ्यावर इतका उमटला कीं, तो पहात असतांना गाडी हलली होती या गोष्टीकडे माझं लक्षंही गेलं नाहीं.

मी आणि पद्मा वेटिंगरूमकडे वळलों. "किती सुंदर बाई आहे ग," चालायला सुरुवात करतांच न राहवून मी म्हणाले, "तेवढा डोळा असता तर रूपाला मोल नव्हतं; अन् किती सारखं मुलीचं कौतुक करीत होती." पण एवढ्या माझ्या वाक्यांना उत्तर म्हणून पद्मावतीनं फक्त 'हं' असा अर्थपूर्ण उद्गार काढला. मनांत असलेला बराच अर्थ शक्य तितक्या थोड्या शब्दांत ध्वनित करणारा पद्माचा तो 'हं' माझ्या पूर्ण परिचयाचा होता. तरी पण त्या विषयावरील तें संभाषण पुढें चालू ठेवण्यासाठीं त्या 'हं' कडे दुर्लक्ष करून मी म्हणाले, "म्हणजे काय, तुला नाहीं वाटत त्या डोळयांनीं तिच्या सौंदर्याचा नाश केला आहे असं?" "रूपसौंदर्याचा." आपली गंभीर दृष्टि चालतां चालतां समोर आलेल्या दिव्याच्या झगझगीत ज्योतीकडे लावून पद्मा म्हणाली. त्या ज्योतींत तिला जणूं काय मला न दिसणारी कसला तरी चित्रमाला दिसत होती. पण पुन्हां एकवार पद्माला बोलती ठेवण्याकरितां मी म्हणाले, "मी तरी तेंच म्हटलं." आपल्या अंतश्चक्षूंसमोरून चाललेल्या त्या चित्रमालेकडे सर्वस्वी लागलेलं अवधान किंचित् माझ्याकडे वळवून पद्मा म्हणाली, "तसं नव्हे ग, माझ्या म्हणण्याचा अर्थ असा कीं, त्या डोळयांनीं

तिचं रूपसौंदर्य कमी झालं असेल पण आत्म्याचं सौंदर्य खास वाढलं आहे." "म्हणजे काय?" मी आश्चर्यचकित स्वरांत उद्गारले. भटकणाऱ्या मनाला किंचित् सांवरण्याचा प्रयत्न करीत व ओव्हरकोटाच्या खिशांत हात घालीत पद्मा म्हणाली, "हे बघ, ती थोडी हकीकतच आहे. पण इथें नाहीं सांगत. वेटिंगरूममध्यें चल, तिथें सांगतें. आपल्या गाडीला अजून अवकाश आहे ना?" पण प्रश्नार्थक म्हणून विचारलेलं हें वाक्य उत्तराच्या अपेक्षेनं उच्चारलेलं नाही ही गोष्ट मला माहीत होती म्हणून मी कांहींच बोलले नाहीं. मला मनांतून आनंद झाला होता. पद्मावतीनें सांगितलेल्या अशा हकीकतीचे प्रसंग म्हणजे आमच्या मैत्रीच्या उद्यानांतलि जणूं काय विसांव्याच्या जागा होत्या. माझ्या दृष्टीला साध्या दिसणाऱ्या एकाद्या गोष्टीच्या मागची भूमिका पद्मावतीनं विशद करून सांगावी व मग माझा त्याच गोष्टीकडे पाहण्याचा दृष्टिकोण बदलावा ही माझ्या परिचयाची गोष्ट होती. पद्मा माझ्यापेक्षां अगोदरच उंच होती, आणि विचाराच्या भरांत मला साहजिकच मागें टाकून ती वेटिंगरूमपर्यंत जाऊनही पोंचली.

गाडी गेल्यामुळं आतां स्टेशनवरची गडबड शांत झाली होती. मी एक खुर्ची पद्मावती बसलेल्या आरामखुर्चीपर्यंत सरकावून तिच्यावर बसले आणि तिला तिच्या तंद्रीतून जागी करण्याकरितां किंचित् लाडिक स्वरांत म्हणाले, "सांग ना काय ती हकीकत." "हं खरंच, सांगते हं." एकदम स्वतःला सांवरण्याचा प्रयत्न करीत पद्मा म्हणाली, "अग, पण ती हकीकत म्हणजे कांहीं मोठी युद्धाची रम्या वार्ता आहे असं नाहीं." किंचित् थांबून पद्मानें पुनः विचार केला. "किंवा आहे म्हटलंस तरी हरकत नाहीं. कारण ती बाई खरंच एका लढाईतून पार पडली आहे. पण अगोदर तूं सांग तुला तिला पाहून काय काय वाटलं तें."

" काय वाटायचं, " मी हंसून म्हणाले, " वाटतं कीं फार सुंदर बाई आहे. फार प्रेमळ आई आहे. पण एक डोळा नाहीं तरी सुखी दिसते बिचारी. "

" होय ना, " पद्मा म्हणाली. " पण पांच वर्षांपूर्वी तिच्या चेहऱ्यावरच्या भावना पाहिल्या असत्यास तर तुला ती प्रेमळ आई वाटली नसती, कारण ती आईच नाहीं. अन् कदाचित् सुंदर बाईही वाटली नसती, आणि तरी त्यावेळेस तिचे दोन्ही डोळे शाबूत होते "

" होय ! " मी आश्चर्यानें म्हणाले, " मग ती छोटी छोकरी तिची कोण ? "

" दूरची भाची. " पद्मानें जवळ जवळ हकिकतीला सुरुवात केली होती. " तुला आठवतं कृष्णा, मी पहिल्यांदां मेडिकल कोर्सकरिता मुंबईला गेले तेव्हां माझ्या वडिलांच्या मित्रांनीं— बापूसाहेब तांब्यांनीं—आग्रह केला म्हणून त्यांच्याच घरीं राहत होते. आमच्या समोरच्या ब्लॉकमध्येंच इंदिराबाई रहात असत. दुरून पाहणाराला इंदिराबाईचा खरोखर हेवा वाटण्यासारखा होता. सुंदर रूप, सपाटून पैसे मिळविण्यास आपली अपत्यहीनता जाणवूं नये म्हणून बायकोच्या मनाला जपणारा प्रेमळ हौशी नवरा. इंदिराबाईचा सगळ्या दिवसाचा कार्यक्रम ठरलेला असे. सकाळीं कांहीं संगीत-शिक्षण, संध्याकाळीं फिरणें अगर सिनेमा. दुपारीं भय्यासाहेब ऑफिसांत गेल्यावर त्यांच्या घरीं कोणाचीं तरी लहान लहान तीन-चार मुलं खेळायला येत. पण तीं अगदीं दरिद्री आईबापांचीं मुलं असावींत असं त्यांच्या वेषाकडे पाहून वाटे. एक दिवस मी काकूंच्या जवळ चौकशी केली, " कोण हो हीं मुलं यांच्या घरीं येतात ? " काकू म्हणाल्या, " त्यांच्या चुलत-भावाचीं. बिचारा अगदीं गरीब आहे. चाळींत राहतो, मुलांना खेळा-

यलासुद्धां जागा नाहीं. तीं इथें येतात दुपारीं.' "चुलतभावाचीं ना? मग ह्या कां नाहीं कुणाला इथें ठेवून घेत? ह्यांच्या घरीं तर लहान कोणीच नाहीं." मला जरा नवलच वाटलं. कारण तीं मुलें कोणालाही आवडण्याइतकीं गोड होतीं. आणि प्रत्यक्ष त्यांच्याच चुलतभावाचीं. त्या मुलांच्या संगतींत, त्यांच्याशीं खेळण्यांत, इंदिराबाईंना आवडत असल्यासारखें दिसे. पण ती गोष्ट त्यांनीं कबूल मात्र कधींच केली नाहीं; उलट, स्वतःच्या सोयीकरितां हीं मुलं येथें येतात आणि त्यांच्यावर लक्ष ठेवण्यांत आपल्याला काळ घालवावा लागतो असें भासविण्याचा प्रयत्न करीत व केव्हां केव्हां तर, "काय मुलांचं सुख आहे? एकाला सदरा आहे तर दुसऱ्याला टोपी नाहीं. किती त्यांच्याकरितां काळजी आणि दगदग! आणि इतकं करून मोठेपणीं आईच्या नशिबीं मुलांकडून हेळसांडच ठरलेली. त्यापेक्षां आमचं आयुष्य बरं!" असेंही बोलून दाखवीत.

"मेडिकल कॉलेज म्हणजे दुपारचा वेळ रिकामा. अशा वेळीं मी पुष्कळदां त्यांच्याकडे गप्पा मारायला जात असे. एक दिवस पावसाळी हवेमुळें तीं मुलें खेळायला आलीं नव्हतीं. तरी त्यांच्या दिवाणखान्यांतून बोलण्याचा आवाज येत होता. म्हणून मी गेले तों वरच्या मजल्यावरच्या भाड्यांच्या रंजूला आणून तिच्याशीं त्या खेळत होत्या. "कां हो, आज तुमची बेबी नाहीं कुठें दिसत?" आंत शिरतां शिरतां मी म्हणाले. "नाहीं आली बाई. कालपासूनच पावसाचा रंग दिसत होता, म्हटलं उद्यां येऊंच नको." "पण पाठवलीत कशाला? इथेंच ठेवून घ्यायचीं असतीत." मी त्यांच्या स्वभावाचा नक्की कयास काढण्याचा प्रयत्न केला. "नाहीं हो," किंचित् तक्रारीच्या स्वरूपांत त्या म्हणाल्या, "त्या मुलांना अगदीं वागतां येत नाहीं. इथं खेळूं दिलं तर कुठें दिवाणखान्यांतील वस्तूच पाडतील, इथेंच राहतों म्हणतील.

मला नाहीं बाई मुलांना संभाळायला येत."

" इंदिराबाई जास्त जास्त बोलत होत्या तों तों माझी खात्री होत होती कीं, त्यांतलं एक अक्षर सुद्धां खरं नाहीं. परमेश्वरानें दिलेल्या बिनमोल देणगीचा आनंद इंदिराबाई हातानें दूर सारीत होत्या. वात्सल्य म्हणजे आपल्या मुलांवर केलेलं प्रेम या भासांत त्या स्त्रीहृदयांतल्या स्वाभाविक प्रेमळ भावनेचा आपल्या हातानें कोंडमारा करीत होत्या. कोणत्याही प्रकारची असहायता पाहिल्या-बरोबर जागा होणारा वात्सल्यरूपी संरक्षक मनोधर्म आणि वेडा अभिमान यांच्यामध्यें जणूं काय सतत लढाई जुंपली होती. कोणत्याही प्रकारच्या प्रयत्नानें साध्य न होणारी ईश्वरदत्त देणगी, जगांत कोंवळ्या असहाय जीवाला जगविण्याचं सामर्थ्य असलेली वात्सल्यरूपी उदात्त भावना, जर वांया जात असलेली पाहिली तर पहाणाराला कसं वाटतं? इंदिराबाईंच्यांत होणाऱ्या त्या भावनेच्या जागृतीवर त्या गरीब मुलांचं भवितव्य अवलंबून होतं.

" त्या नंतर थोड्याच दिवसांत सुटी होऊन मी घरीं गेले. पण मनांत चाललेल्या लढाईचं इंदिराबाईंच्या सुंदर चेहऱ्यावर पडलेलं दुःखी प्रतिबिंब, आणि ते पडलं नाहीं असं भासविण्याचा त्यांचा आटोकाट प्रयत्न, मी विसरलें नाहीं. दुसऱ्याला सुख देऊन सुखी होण्याचा मार्ग इंदिराबाईंनीं आपल्या हातांनीं रोखला होता.

" मी सुटीहून परत आले तों मुंबईत देवीची सांथ उसळली होती. इंदिराबाई त्या सांथीला बळी पडून हॉस्पिटलमध्यें होत्या. परत आल्या तों त्यांच्या सुंदर मुखचंद्राला अंधत्वाचं ग्रहण लागलेलं.

" देवीसारखं दुखणं! तेव्हां श्रीमंत आईबापांच्या रंजूला खालीं येण्याची बंदी झालेली आणि इंदिराबाईंच्या वहिनी दिवाळी-

करितां मुलांना घेऊन माहेरीं गेलेल्या.

" मी पुष्कळ वेळां त्यांच्याकडे जाऊन बसत असे. इंदिराबाईंना कांहीं तरी वाईट वाटत असावं, चुकल्यासारखं वाटत असावं असा मला भास होई. एकदां विचार आला, आपल्या सौंदर्य-नाशामुळें भय्यासाहेबांच्या वृत्तींत फरक पडेल अशी तर भीति त्यांना वाटत नव्हती ना ? पण संशय निराधार ठरला. देवीपासून प्रेमळ भय्यासाहेब त्यांना जास्तच जपत. पण इंदिराबाईंचीच प्रेम करून घेण्याची हौस पूर्ण झाली होती. वात्सल्याची तहान भागली नव्हती.

" शेवटी एक दिवस मी त्या घरांत पतिपत्नींचा संवाद ऐकला. इंदिराबाई अगदीं गद्गद स्वरांत भय्यासाहेबांना विनंति करीत होत्या, " बेबीला आणतां ना आजोळाहून इकडे ? ती आली म्हणजे मला बरं वाटेल."

" बेबी आलेली मी पाहिली नाहीं कारण भय्यासाहेबांची मुंबईहून बदली झाली. पण बेबी आल्यानंतरचीं कित्येक दृश्यं मी माझ्या मनश्चक्षूंसमोर उभीं करीत असे अन् त्यांतलं एक तर तूंच स्वत: आज डोळ्यांनीं पाहिलंस."

# शास्त्रज्ञाचा शोध !

जयंत पारखी व त्याचे दोन मित्र कुसुमाकर फडणीस आणि चंद्रकांत कोतवाल गप्पा मारीतच घरांत शिरले. नुकतेच फिरून आलेले, तेव्हां तिघेहि गप्पांतच दंग होते.

दिवाणखान्याच्या एका बाजूच्या टेबलाशीं बसून जयंताचा धाकटा भाऊ छोटू इंग्लिश शब्दांवर घोकया मारीत होता ! नुकताच इंग्रजी दुसरींत गेला होता; नव्यानें इंग्रजी शिकतांना इंग्रजी शब्द म्हणजे काय अमोल चीज वाटते तें काय सांगायला हवं ? छोटू 'तीन राजकन्यां' ची गोष्ट वाचीत होता. त्यांत त्याला माहित नसलेला Love शब्द आला. छोटू जरासा विचार करणार तोंच फिरून परत आलेलं वरील त्रिकूट त्याच्या दृष्टीस पडलें; त्याबरोबर छोटू एकदम म्हणतो, " दादा ! एल्-ओ-व्ही-ई म्हणजे काय रे ? "

" थांब सांगतों हं "-जयंत तसाच पुढें सटकला ! बाल-गोपालांचें इंग्रजी अध्ययन म्हणजे मोठ्या माणसांचे हाल. येतां-जातां त्यांना ज्ञानामृत पाजण्याचा पवित्र उद्योग बिनतक्रार करावा लागतो ! त्या प्रसंगांतून शक्य तों लवकर सुटावें म्हणून तडक जयंतानें आपल्या खोलीची वाट धरली. त्याच्या पाठोपाठ

त्याचें मित्रद्वयहि गेलें; बिचारा छोटू पाहतच राहिला! छोटूची करुणा येऊन अगदीं साहजिकपणें कुसुमाकर म्हणाला, " अरे ए दादा, तो तुझा लहान भाऊ तुला शब्दार्थ विचारतोय. "

जयंताच्या विनोदी वृत्तींना अगदीं चेतना मिळाली! कुसुमाकर प्रेमपाशांत सांपडलेला होता, थोड्या दिवसांनीं विवाहबद्ध होणार होता, आणि आतां त्याला Love शब्द विचारणाऱ्या छोटूचा अगदीं कळवळा आला होता! एवढ्या सामुग्रीवर जर विनोदी, चिकित्सक, शास्त्रीय वृत्तीच्या जयंतानें थोडा वेळ करमणूक करून घेतली नसती तर ती गोष्ट त्याच्या स्वभावधर्माविरुद्ध झाली असती! " अरे बावाऽऽ " त्या त्रिकूटाच्या पाठोपाठ जाऊन उत्सुकतेनें खोलीच्या दाराशीं उभ्या राहिलेल्या छोटूकडे पाहून जयंत मिस्किलपणानें म्हणाला, ' त्या शब्दाच्या अर्थासंबंधानें विविध प्रकारचीं मतें प्रचलित आहेत; काय समजलास? " आपल्या छळाच्या एकांकी नाटकाची नांदी म्हटली गेली ही गोष्ट कुसुमाकरच्या पुरती लक्ष्यांत यावी म्हणून जयंतानें त्याच्याकडे एक अर्थपूर्ण दृष्टिक्षेप केला व पुन्हां आपल्या वाक्याला गंभीरपणें सुरुवात केली. " कोणी त्याला अमृत म्हणतात, कोणी विष म्हणतात. मानसशास्त्राच्या दृष्टीनें Love ही काय चीज आहे हें मी तुला सांगेन, व वाङ्मयवीरांनीं विशेषतः कवींनीं Love ही काय चीज मानली आहे त्याचें निरूपण हा चंद्रकांत करील "

प्रेमळ छळणुकीच्या त्या सत्कार्याला चंद्रकांतानें सक्रिय मदत करावी अशा अपेक्षेनें त्याच्याकडे हेतुपूर्ण दृष्टीनें पाहत जयंतानें विचारलें, " होय ना चंद्रकांत? "

चंद्रकांतहि आतां सरसावला!

जयंतानें पुन्हां सुरुवात केली–" छोटू ऽऽऽ! ह्या Love

चे दोन प्रकार मानण्यांत आले आहेत. एक Platonic Love व दुसरा Romantic Love; कांहीं शास्त्रवेत्त्यांनीं Romantic च्या विरुद्ध Mature असाहि एक प्रकार कल्पिला आहे. आतां त्यांपैकीं पहिला प्रकार सांगतों:—आपल्याला आवडणाऱ्या पोरीशीं गुलगुल गोष्टी करायच्या, व त्या गोष्टी आम्हांला बौद्धिक समाधान देतात, त्यांत विकारवशतेचा अंश सुद्धां नाहीं, अशा थापा मारून वर समाजाच्या संकुचित दृष्टीला दोष द्यायचा. प्रेमाच्या या 'तेरी उप्पर मेरी' प्रकाराला Platonic Love अशी संज्ञा आहे."

छोटू परत जाण्याची तयारी करूं लागला!

"Romantic Love जें, त्याचा प्रकार थोडा निराळा आहे; त्याचें स्वरूप पावसाळ्यांतल्या पुण्याच्या रस्त्यासारखें असावें; कारण लोक त्यांत नेहमीं पडतात."

"खरंच!" चंद्रकांतानें टेकू दिला. "गार्डिनरसारख्या सजाण माणसानें इषारा दिला आहे कीं, 'People should not fall in love, they should walk into it.' तरी पडतात!"

"अरे एऽऽ" कुसुमाकरनें तोंड उघडण्याचा वृथा प्रयत्न केला!

"जाऊं दे रे! हा चंद्रा थापा देतो पण..." कुसुमाकरला बोलण्याला सवड न देतां शक्य तों स्वर उंचावून जयंतानें पुन्हां गडबडीनें सुरुवात केली. कारण जयंत जाणून होता कीं, दोन माणसांनीं एकमतानें तिसऱ्याच्या जिवावर करमणूक करण्याच्या कलेची हीच तर मख्खी आहे! आपलें तात्पुरतें भक्ष्य झालेल्या त्या दुर्दैवी जिवाला तोंड उघडण्याची संधि दिली नाहीं तरच ठीक! एकदां कां स्वतःला सांवरून त्यानें एक वाक्य तडीला

लावण्याची करामत दाखवली कीं सगळया गमतीची विरी गेलीच म्हणून समजावें ! उलट त्याचीच आपल्यावर मात होण्याचा संभव अधिक !

" पण शास्त्रज्ञांचीं मतं सुद्धां त्याच्या स्वरूपाबद्दल वेगवेगळीं आहेत. जेम्सच्या मतें सगळयाच Emotions म्हणजे एक शारीरिक विकृति आहे, तसंच Love, दुसरें कांहीं नाहीं. "

बिचारा छोटू पसार झाला !

जयंतानें पुन्हां सुरुवात केली–" उलट रसेल म्हणतो कीं, ' Romantic love is the source of most intense delights that life has to offer. ' "

" हो, वाङ्मयांतसुद्धां वर्णन आहे ना. भवभूतीनं म्हटलेंच आहे–' व्यतिषजति पदार्थानान्तरः ... "–चंद्रकांताच्या टाळक्यांतली ज्ञानगंगा गीर्वाणभाषास्वरूपांत वाहूं लागली !

पुन्हां एकदार कुसुमाकरानें बोलण्याचा विफल प्रयत्न केला !

"बरें, त्याचें आणखी एक लक्षण–अर्थात् कवीच्या मतानें–असं आहे कीं तें आंधळें आहे ! आमच्या मॅक्डूगल साहेबांच्या मतें ' It is not blind, it is all-seeing. ' ते सरळच सांगतात–' It is not a mysterious entity, Cupid's dart that falls upon us like a bolt from the blue. ' " जयंत एकेक शब्दावर गंभीरपणें जोर देऊं लागला. " ' It is a highly complex sentiment which changes and developes and which may degenerate and decay. ' अर्थात् प्रेमी जनांना हें वर्णन गोड लागत नाहीं तें वेगळें. "

" हो, प्रेमी देवयानी त्याचें वर्णन ' जननी चलाचला प्रीती जीवकला ' असंच करते. " चंद्रकांत म्हणाला.

" बरं, इकडे Beran Wolfe म्हणतो कीं, ' Love is friendship plus the element of hetero-sexual co-operation. ' पण त्याबरोबर तो असंहि कबूल करतो कीं,"– कुसुमाकरकडे पुन्हां मिस्किलपणें पाहत जयंत म्हणाला– " ' It is the most thrilling of all human co-operative ventures. ' अरे, आमची Wilco तर त्याचं ' Centre and circumference and cause and aim of all things ' असें जॉमेट्रीच्या भाषेंतच वर्णन करते !"

शरणचिठ्ठी दिल्याची खूण म्हणून कुसुमाकरनें एक सिगारेट पेटविण्याचा शांतपणें प्रयत्न केला, पण चंद्रकांतानें तोहि हाणून पाडला !

छोटू गेला ह्या सत्याकडे मुद्दाम दुर्लक्ष्य करून पुन्हां जयंताची चटोर चर्पटपंजरी सुरू झाली !

" बरं, ऐतिहासिक दृष्ट्या विचार केला तर असें आढळून येतं कीं, Middle Ages च्या पूर्वी जरी तें लोकांना माहित होतें, तरी त्याच्या खऱ्या स्वरूपाची दखलगिरी Middle Ages पासून लोकांनीं घेतली. Renaissance मध्यें Love चं Platonic स्वरूप पालटून त्याला Poetic स्वरूप आलें, अन् मग जी काय Love Poetry बोकाळली म्हणतोस ! "

" हो, आमचा शेले तर Romantic Love च्या त्या अफाट दर्यांत नुसता डुंबतच असे. "

" पण त्यावेळेस अशी कल्पना होती कीं, Love ला अडथळा पाहिजे, त्यावांचून मजा नाहीं. नाहींतर आपली दिली वडलांनीं चटकन् परवानगी अन् ठरला जवळचा मुहूर्त–त्यांत मजा नाहीं; हा म्हणजे Love चा अगदींच बेचव प्रकार–काय

कुसुमाकर ! ”

“ अरे, पण French Revolution नंतर Love च्या कल्पनेचं स्वरूप बदललं नाहीं का, अन् ज्यावर प्रेम त्याच्याशींच लग्न केलेलें बरं असंहि लोकांना वाटूं लागलें ! ” चंद्रकांत म्हणाला.

“ अन् आज Great War नंतर असें ठरलें आहे कीं, ‘ Love is a main extra-rational activity. ’ बग्, आमच्या फ्रॉइडसाहेबांचं तत्संबंधीं मत न बोललेलंच बरं अन् ‘ Humanity Uprooted ’ मध्यें तर त्याला पूर्ण विरामच. ”–जयंत थोडा थांबून कुसुमाकरकडे पाहूं लागला.

“ बस् संपलं ? असेल ना अजून थोडा इतिहास शिल्लक ! नाहीतर पुढचं भविष्य तरी–” चिडून आपल्या मित्रद्वयाकडे पाहत कुसुमाकर म्हणाला. आपल्या दीर्घ प्रयत्नांना यश आलें अशी खात्री पटून चंद्रकांत व जयंत यांना आलेल्या हंसण्याच्या प्रचंड लाटांनीं त्या संभाषणाचा शेवट झाला !

  

वरील हकीकतीनंतर दोनच वर्षांनीं जयंताची बृहन्महाराष्ट्रांतल्या एका कॉलेजांत तत्त्वज्ञान व समाजशास्त्राचा अध्यापक म्हणून नेमणूक झाली व पावसाळ्याच्या सुमारालाच जयंत आपल्या नव्या जागेवर रुजू झाला.

मुंबईच्या मानवनिर्मित सृष्टींतून जयंत निसर्गाच्या सृष्टीत जाऊन पडला. खूप पाऊस पडला म्हणजे मुंबईस ट्रॅम बंद होते हें त्याला माहित होतें, पण नजरेच्या टप्प्यांतला सगळा प्रांत हिरवाचार होऊन त्याला असीम शोभा चढते, पाऊस उघडला कीं दूर अंतरावर निळं निळं आकाश टेकड्यांना स्पर्श करताहेसें वाटतें, हें दृश्य त्याला नवीन होतें ! निसर्गसौंदर्याचीं

कितीतरी सुंदर वर्णनें जयंतानें रंगून वाचलीं होतीं–पुस्तकांतून! मनुष्यानें निसर्गावर मात केल्याचें तत्त्वज्ञान शिकतां–शिकतां, मनोवृत्ती विकसित करणाऱ्या निसर्गाच्या उदात्त सौंदर्यदर्शनाला जयंत मुकला होता त्यानें आतां नव्या कॉलेजांत, नव्हे नव्या सृष्टींत, प्रवेश केला!

कॉलेजांत पाऊल टाकल्याच्या दिवशींच त्याला कळलें कीं, आपल्या वर्गांत एक हुषार विद्यार्थिनी–रत्नाकर पंडित नांवाच्या आर्यसमाजिष्टाची मुलगी-आहे; जयंताला साहजिकच थोडेंफार कुतूहल वाटलें!

पण त्याच्या कुतूहलाला फार ताण पडला नाहीं. त्याची शिष्या मध्यम बांध्याची, सांवळ्या वर्णाची, प्रसन्न चेहऱ्याची व रेखीव नाका-डोळ्यांची सुमारें २४ वर्षांची तरुणी होती. पहिल्याच दिवशीं जयंताची आपल्या विद्यार्थिनीबरोबर भाषा झाली. अजिता त्याला थोडीफार मितभाषी, गंभीर वाटली. पण बोलतांना तिनें ज्या शोधक दृष्टीनें–कदाचित् आपल्या नव्या गुरूची विद्वत्ता अजमावण्याकरतां असेल अशी जयंताची कल्पना झाली- पाहिलें ती दृष्टि मात्र तो विसरला नाहीं. पण एकंदरींत जयंताचें आपल्या शिष्येबद्दल फार चांगलें मत झालें.

संध्याकाळीं तो घरीं आला. कॉलेजांतला त्याचा पहिला दिवस. त्याच्या आयुष्यांत तो कितीतरी महत्त्वाचा दिवस होता. त्या दिवसाच्या यशावर त्याच्या भविष्यकाळच्या यशाची मदार होती, व म्हणून साहजिकच चिकित्सक वृत्तीनें तो त्या दिवसाचें सिंहावलोकन करूं लागला.

त्याच्या सिंहावलोकनांतून एकच निष्कर्ष निघाला–अजिता पंडित नांवाची एक मुलगी आज त्याला कॉलेजमध्यें भेटली–

जयंताच्या सिंहावलोकनाची मजल त्या विचारापुढें गेलीच

नाहा ।

  

थोड्याच दिवसांत अजिताची व जयंताची बरीच ओळख झाली व ती गप्पाहि मारूं लागली, निदान जयंत बोलत असे अजिता ऐकत असे, आणि कधीं कधीं आपली चिंचोळी हनुवटी वर उचलून नुसतें हूं म्हणे-

आणि त्या एका हूंकरितां जयंत पन्नास शब्द खर्च करीत असे!

नव्या कॉलेजांत आल्यापासून सरस्वती तर त्याच्या जिभेवर नुसती नाचत होती. लेक्चर्सची तो अगदीं कसून तयारी करीत असे. कारण त्याला वाटे—" महाराष्ट्रांतून आपण इतक्या लांब आलों, आपलें अपयश म्हणजे महाराष्ट्राची अब्रू, ती अशी जातां कामां नये ! "

जयंत एकटा राहत असे, एकटाच फिरावयाला जात असे; पण त्याला कधीं कंटाळा आला नाहीं, कधीं कोणाशीं मैत्री करावी असें वाटलें नाहीं. फिरावयाला जातांना अजिताबरोबर केलेल्या गप्पागोष्टी त्याला कितीतरी वेळां आठवत आणि त्यांची मनांत पुनरावृत्ति करीत जयंत मैल-मैल भटके !

पुढें-पुढें तर गुरु-शिष्या-भाव लोपून त्याची व अजिताची चांगलीच गट्टी जमली. अजिताहि आतां खूप बोलत असे. त्यांच्या आवडीनिवडी सारख्या होत्या. जयंताला दिवसेंदिवस ती अगदीं जिव्हाळ्याच्या मित्रासारखी वाटूं लागली. एकदां तर तो तिला स्पष्टच म्हणाला कीं, " मी एकटा इथें आलों तेव्हां मला फार अवघड वाटलें, कारण माझें जीवनच मित्रमय होतें; पण मित्र-प्रेमी मनुष्याला काय, जावें तिकडे मित्र भेटतातच नाहीं का ? "

तीं दोघें जें काय बोलत तें कॉलेजमध्येच. कधीं एक-मेकांच्या घरीं जात नसत, पण एखादे दिवशीं जर अजिता

तास संपल्याबरोबर परस्पर घरीं गेली तर जयंताला चुकल्यासारखें होई! आपल्याला आज अशी विमनस्कता कां आली आहे ह्याचाहि तो विचार करण्याचा प्रयत्न करी आणि शेवटीं आपल्याला फार दिवसांत कुसुमाकरचें अगर चंद्रकांताचें पत्र नाहीं, इथें एकटेपणामुळें कंटाळा वाटतो, असा मनाशीं निकालहि देऊन टाकीत असे!

आणि ज्या दिवशीं अजिताशीं मनसोक्त गप्पा करून प्रफुल्ल अंतःकरणानें जयंत घरीं येई त्या दिवशीं "आज फार दिवसांनीं घरचें पत्र आल्यामुळें किती आनंदांत दिवस गेला" असा त्याला भास होई!

आणि परदेशांतले एकलकोंड्या आयुष्याचे जयंताचे दिवस त्याला किती लवकर संपले असें वाटलें!

टर्म संपली, सुटीची नोटीस लागली, ती वाचल्याबरोबर जयंताच्या मनांत एकदम विचार आला, "आतां आपण घरीं जाऊं–आपल्याला अजिता रोज भेटणार नाहीं." अंतःकरणाच्या एका कोपऱ्यांत कुठेंतरी वेदना झाल्यासारखा त्याला भास झाला. "काय सहवासाचा परिणाम असतो!" किंचित् हंसून तो मनाशींच म्हणाला, पण त्या परिणामाची त्याला दोन दिवस हुरहूर लागली होती!

आणि ज्या गोष्टीची त्याला इतकी हुरहूर लागली होती ती शेवटीं सुटीपूर्वीच त्याच्या अनुभवाला आली. कधीं लेक्चर न चुकवणारी अजिता त्याच्या तासाला एक दिवस गैरहजर होती.

ती संध्याकाळ जयंताला फार वाईट गेली; त्याला वाटे ती आजारी तर नसेल? गेले चार महिने जयंत शिकवीत होता, त्याच्या वर्गांत विद्यार्थिनी असत, त्या आजारीहि पडत,–पण

त्यांच्या प्रकृतीची जयंताला कधीं काळजी वाटली नव्हती. तो मनांत म्हणाला, " इतकी हुषार शिष्या मला आजपर्यंत भेटली नव्हती. आतां हिनें आजारी पडतां कामांच नये. "

अजिता दुसऱ्याहि दिवशीं आली नाहीं; ती खरोखरच आजारी होती.

त्या चार दिवसांत मनुष्य—विवेचक व शास्त्रीय प्रवृत्तीचा मनुष्य—अकारण अस्वस्थ झोंप घेतो, केव्हां-केव्हां त्याच्या अंतःकरणाची उगीच तगमग होते, तो नोकरांवर विनाकारण ओरडतो, व पूर्ण तयारी करून गचाळ लेक्चर वर्गांत देऊं शकतो,-अशीं किती तरी ' शास्त्रीय सत्यें ' जयंताला कळलीं !

सहाव्या दिवशीं अगदीं अनपेक्षितपणें किंचित् कोमेजलेली अजिता त्याला लायब्ररींत भेटली. जयंत जणूं काय बोलण्याच्या मनःस्थितींत नव्हता.

" बरें वाटतें आतां ? " त्यानें एकदम विचारलें.

" हं " ती खालीं पाहत म्हणाली, पण तिची कोमेजलेली चर्या थोडी फार प्रफुल्ल दिसते आहे असें त्याला वाटलें.

चार दिवस सोसलेल्या मानसिक हालांचा जयंतानें एकदम वचपा काढला ! किंचित् घुश्शांतच तो तिला म्हणाला, " आजारी होतां तर चिठी पाठवून मला का नाहीं भेटायला बोलावलंत ?"

" तुम्हांला वेळ असेल कां नाहीं असं वाटलें. "

" हो, पण कळवून तर पाहायचं होतं, "-अजिताची अपराधिनीची मुद्रा पाहून जयंत जास्तच जोरांत आला. " आतां शिक्षा म्हणून तुम्हांला माझ्याकडे चहाला आलें पाहिजे. "

अजिताला शिक्षा पटली ! तिच्याच गाडींतून तीं दोघें त्याच्या बंगल्यावर गेलीं. चार-सहा दिवस पारखा झालेला आनंद त्या बंगल्यांत जणूं काय मूर्तरूपानें अवतरला !

~ ~ ~

आतां जयंताचे दिवस अगदीं क्षणासारखे जात होते. ॉलेजच्या तीन तासांनीं उरलेल्या एकवीस तासांत चैतन्य निर्माण ले होतें! आपल्याबरोबर अजितानें फिरावयास यावें असेंहि याला केव्हां केव्हां वाटे, पण त्यानें तसें तिला म्हटलें नाहीं.

आणि एके दिवशीं तो फिरायला गेला असतां त्याला रून अजिता दिसली. ती एकटी नव्हती; तिच्याबरोबर साहेबी ापास केलेला एक तरुण जंटलमन होता. जयंतला राग आला! ाटेल त्या माणसाच्या सहवासांत अजितानें वेळ काढावा ही ोष्ट त्याला पसंत पडली नाहीं! त्या दोघांना शिताफीनें टाळून ायंत दुसऱ्या रस्त्यानें घरीं आला, पण त्याला कितीतरी वेळ ो गृहस्थ आठवत होता!

आणि तो "वाटेल तो मनुष्य" उर्फ तिचा सख्खा आते-ाऊ दुसऱ्या दिवशीं परत गेला!

सुट्टी लागली. जयंताला पोंचवण्याकरतां अजिता स्टेशनवर ाली होती; पण ती बोलत नव्हती! इच्छा असूनहि तिला ोलवत नाहीं असें त्याला वाटलें! गाडी सुटली! अंतःकरण ारून येतें म्हणजे काय होतें, वृत्ती पर्याकुल होतात म्हणजे ाय होतें, मनाची तडफड होते म्हणजे काय होतें, सगळ्यांचा ानुभव जयंतला आला!

~ ~ ~

सुट्टीत घरीं आला खरा, पण पूर्वीचा बडबड्या आणि मेत्रसहवासांत मोक्ष मानणारा जयंत थोडाफार अबोल आणि ्कलकोंडा झाला होता!

एका स्थानिक कॉलेजमधल्या "डिबेटिंग यूनियन" च्या ्फेसरांनी त्याला एका वादाच्या प्रसंगीं अध्यक्षपदाची विनंति

केली. विवादाचा विषय होता 'विवाहोत्तर प्रेम कां प्रेमोत्तर विवाह.' आणि जयंत होता जाडा तत्त्वज्ञ आणि समाजशास्त्रज्ञ!

'विवाहोत्तर प्रेमा'ची बाजू एका मुलीनें मांडली! तिचें वक्तृत्त्व व विचारसरणी दोन्हीहि सुंदर होतीं. 'प्रेमोत्तर विवाहां'त व्यक्तिसुख असेल पण समाजाच्या स्थैर्याच्या, सामुदायिक सुखाच्या, दृष्टीनें 'विवाहोत्तर प्रेम'च इष्ट होय आणि पुष्कळांच्या सुखाकरितां आपल्या वैय्यक्तिक सुखाचा त्याग करण्यास मनुष्यानें शिकलें पाहिजे;- इत्यादि.

जयंताच्या विचारी मनाला सुद्धां तीच विचारसरणी ग्राह्य वाटत होती. कमल गोखलेच्या बाजूचा आपल्या अध्यक्षीय भाषणांत पुरस्कार करून जयंत घरीं आला.

  

तीन–चार दिवसांनंतर एक दिवस संध्याकाळीं अण्णासाहेबांनीं –त्याच्या वडील बंधूंनीं जयंताला गंभीरपणानें हांक मारून त्याच्या लग्नाचा सरळ सवाल टाकला. डिबेटमधली विजयिनी कमला त्याला सांगून आली होती! खुद्द अण्णासाहेबांना ती पसंत होती व जयंतालाहि ती पसंतच पडावी अशी त्यांची सहजच अपेक्षा होती.

जयंतानें तिला पाहिली होती. रूप, गुण, शिक्षण कोणत्याच दृष्टीनें कमला नाकारण्यासारखी नव्हती. तरी जयंत गोंधळला–कल्पनेबाहेर गोंधळला आणि 'उद्यां सांगेन' एवढेंच बोलून आपल्या खोलींत परत आला.

कमल गोखलेचा विचार करण्याकरितां जयंत आंत आला खरा, पण खोलींत पाऊल टाकतांक्षणींच त्याला कळलें कीं आपण अजिता पंडितचा विचार करीत आहों! आणि आजच नव्हे तर आज कित्येक दिवस आपल्या अंत:करणाचा कानाकोपराहि

त्या विचारानें इतका व्यापला आहे कीं आपण कमल गोखलेचा विचारच करूं शकत नाहीं! तिच्याच काय पण अजिता पंडित-वांचून दुसऱ्या कोणत्याच मुलीच्या चिरकालीन सहवासाची कल्पना आपल्याला असह्य होते आहे!

हे केव्हां झालें त्याचें त्यालाच कळेना! क्षितिजाच्या वर सूर्य केव्हां येतो तें नक्की कळतें, पण पहांटेच्या अंधुक अंधारांचें बाराच्या तेजाळ प्रकाशांत कसकसें रूपांतर होतें तें कळत नाहीं. पहांटे आपण चांचपडतों, थोड्या वेळानें म्हणतों, 'उजाडलेंच आतां,' आणि बारा वाजतां म्हणतों, 'किती लख्ख प्रकाश पडला आहे.' पण तो कुठून येतो, कसा येतो, अणुरेणूला कसा व्यापतो तें कळतें कां?

तीच स्थिति जयंतच्या मनाची झाली होती. अजिताच्या सहवासांतले उन्मादी आनंदाचे क्षण, ती दुरावल्याबरोबर होणाऱ्या उदास मनोवृत्ती, तिच्या सहवासाकरितां मनाची चाललेली धडपड, —सगळ्या गोष्टी त्याला आठवल्या, त्यांचा अर्थ कळला. त्याला वाटलें "एकदम उठावं, सांपडेल ती पहिली गाडी गांठून अजिताकडे जावं, शब्दांचं दुर्बल साधन बाजूला सारून तिला आपला भाव निवेदन करावा, अंतःकरणाची तळमळ शांत करावी, तिच्या सहवासांत राहावं—जन्मभर राहावं." आणि आतां जयंताला कमलेची आठवण झाली; "कमा!"-स्वतःची जणूं काय लाज वाटून तो मनाशीं म्हणाला—"तुझ्या निर्व्याज वृत्तीना जर मी लग्न करून फसवलं तर जन्मभर पश्चात्तापानें दुःखी होईन -तुला दुःखी करीन."

  

दुसऱ्याच दिवशींची सकाळ. जयंतानें अजून आपला नकार अण्णासाहेबांना कळवला नव्हता, त्यामुळें त्याला मनावर

कगलें तरी दडपण पडल्यासारखें वाटत होतें. रात्रीचे विचार आणि अजिताची आठवण ह्यामुळें जयंत थोडासा अस्थिर झाला होता आणि अस्वस्थपणें खोलींत एकटाच येरझारा करीत होता, इतक्यांत त्याला त्याच्या छोट्या पुतणीचा-मृदुलेचा-मंजुळ आवाज ऐकूं आला, " जयाकाका ऽ ऽ ! "

नेहमींच्या सहवासांतल्या छोटूकाकापेक्षां दूर गांवाहून आलेल्या जयाकाकावर अलिकडे मृदुलाबाईंची मर्जी असे !

मृदुला आंत आली. नेहमींच्या लांड्या फ्रॉकच्या ऐवजीं आज वाढदिवसानिमित्त ती जरीचा परकर-पोलका नेसली होती आणि ते जरीचे कांठ मृदुलेच्या गोजिरवाण्या मांसल दंडावर चापून बसले होते.

तो मूर्तिमंत निर्व्याज आनंद पाहून जयंतच्या त्रासलेल्या वृत्ती किंचित् विसांवल्या ! " हं, काय म्हणतां मृदुलाबाई ? " तिला जवळ घेत तो म्हणाला.

हातांत आणलेल्या कुठल्यातरी मराठी पुस्तकांत असलेल्या ' लव्ह ' शब्दाचा अर्थ जाणण्याची मृदुलाबाईंची खटपट होती ! " ल् ल् व ह् म्हणजे काय रे जयाकाका ? "

तिच्या हातांतलें मराठी पुस्तक पाहून जयंत हंसून म्हणाला, " अग वेडे ! तो इंग्रजी शब्द आहे. "

मृदुला धांवतच बाहेर गेली.

Love म्हणजे काय ? कितीतरी गोड आठवणींनीं जया-काकाच्या डोक्यांत गर्दी केली, पण तीं गोड स्मृतिचित्रें फार वेळ टिकलीं नाहींत; पायांतले पैंजण छुमछुम वाजवीत मृदुलेची कटकट पुन्हां आंत आली; तिच्या हातांत छोटूच्या टेबलावरची ' पॉकेट डिक्शनरी ' होती !

" ह्या पुस्तकांत छोटूकाका इंग्रजी शब्द पाहतो, तूं पाहा ना

ह्या ऽ ऽ ”

“ डिक्शनरींत ! ” मृदुलेची उच्चाराची तिरपिट पाहून जयंतला किंचित् हंसूं आलें. “ पण ही फार लहान आहे, हिच्यांत नाहीं त्या शब्दाचा अर्थ सांपडत ! ” जयंत गंमतीनें म्हणाला.

“ वरं मग मी मोठं तांबडं पुस्तक आणूं ? त्यांत खूप शब्द आहेत–छोटूकाका पाहतो ना सारखे–सारखे. ”

“ अंहं: त्यांत सुद्धां नाहीं तो शब्द सांपडणार. ” जयंत कसल्या तरी तंद्रींत येत होता. बिचारी मृदुला थोडी निराश झाली–पण पुन्हां तिला अण्णासाहेबांच्या टेबलावरच्या त्याहून मोठ्या पुस्तकाची आठवण झाली. “ मग त्या अगदीं मोठ्या पुस्तकांत सांपडेल त्याचा अर्थ ? ”—हातानें अगदीं मोठ्या पुस्तकाचा अभिनय करीत ती म्हणाली.

“ नाहीं ग बाळ ! त्यांत सुद्धां त्याचा अर्थ सांपडत नाहीं. ” जयंत चांगलाच भावनाकुल झाला. आश्चर्यभरानें उजवा हात एकदम तोंडावर ठेवून व भुंवया उंचावून मृदुला म्हणाली, “ नाहीं ? मग कोणत्या पुस्तकांत सांपडतो काका त्याचा अर्थ ? ”

“ कोणत्याच नाहीं ! ” भावनेच्या आवेगानें मृदुलेचे गोंडस दंड हातांत धरून जयंतानें तिला पटकन् उचलून टेबलावर उभी केली आणि लक्ष्यपूर्वक तिच्याकडे पाहत पण जणूं काय स्वतःशींच तो म्हणाला, “ बच्चा ! त्या शब्दाचा अर्थ पुस्तकांत सांपडत नाहीं–जीवनांत सांपडतो, आणि तो अर्थ शिकून कळत नाहीं —अनुभवावा लागतो. ”

# अभिनव स्त्रीराज्य

"नाहीं राजाभाऊ, तूं शेतकी कॉलेजांत जावेंस हेंच अनेक दृष्टींनीं योग्य आहे." प्रल्हादपंतांनीं अगदीं शेवटचा निर्णय दिला! निर्णय तो! सावकारी छापाच्या गंभीर घनगर्जनेनें दिला काय, अगर प्रेमळ पित्याच्या वात्सल्यपूर्ण स्वरांत दिला काय, राजाला त्याचा अर्थ एकच होता, व तो म्हणजे त्याला शेतकी कॉलेजांत जाणें भाग होतें! आपल्या चेहऱ्यावरची निराशेची गडद छाया वडिलांना दिसूं नये म्हणून त्यानें तडक आपल्या खोलीचा रस्ता धरला व तेथें खिन्नपणें येरझारा घालण्यास सुरुवात केली!

राजाच्या तरुण अंतःकरणांत नैराश्याचा अंधार व्हावा असाच तो निकाल होता! वास्तविक पहातां आजपर्यंत राजाला घोर निराशा, तज्जन्य निबिड अंधकार, दीर्घ सुस्कारे, शून्य दृष्टि इत्यादि गोष्टींचा परिचय असण्याचें कारणच नव्हतें! १२०० रुपये शेतसारा भरणाऱ्या श्रीमंत मनुष्याचा उतार वयांत अनेक नवसासायासांनीं झालेला तो एकुलता एक कुलदीपक होता. राजाच्या शिक्षणाला सुरुवातच आठव्या वर्षीं! त्यानंतर सुद्धां त्यानें आपल्यापासून दूर जाऊं नये म्हणून त्या वत्सल मातापित्यानें

घरींच मास्तर ठेवून त्याच्या शिक्षणाची सोय केली. वयाच्या २० व्या वर्षी मॅट्रिकच्या वर्गांत शाळेंत जाणें इष्ट वाटल्यावरून त्यांनीं त्याला कुडूकदार्डीपासून थोड्याच अंतरावर असलेल्या अर्धवट शहरगांवच्या हायस्कूलमधें पाठवलें. परंतु शाळेंत जाण्यापूर्वी आपल्या कानांतली टपोऱ्या मोत्यांची बिगबाळी निघाली पाहिजे असा राजानें हट्ट धरला, तेव्हां मात्र अन्नपूर्णाकाकूंच्या डोळ्यांत पाणी आलें !

अशा प्रेमळ छायेंत राजाचें बालपण गेलें होतें व त्यामुळेंच त्याला दुःखाचा परिचय असण्याचें कारण नव्हतें; परंतु बालमनाच्या अतीव हर्षाचीं कारणें तरुण मनाच्या हर्षाचीं साधनें होऊं शकत नाहींत, या निसर्गनियमानेंच राजाच्या गेल्या दोन-तीन वर्षांच्या आयुष्यांत अस्वस्थता निर्माण केली होती ! पैसा, प्रेमळ आईबाप, वेळोवेळीं कौतुक करणारे आश्रित व नातेवाईक इतक्या सगळ्या गोष्टी होत्या पण—

राजाच्या स्वभावांत जात्याच काव्यात्मतेचें बीज होतें. त्याला वाचतां येऊं लागल्यापासून इकडून तिकडून जमवून त्यानें प्रेमानें जर कसलीं पुस्तकें वाचलीं असतील तर त्या कादंबऱ्या व काव्यें ! सुरुवातीसुरुवातीला अरेबियन नाइट्समधें गुंगणारा राजा हळू हळू वज्राघात, सम्राट अशोक, छत्रसाल इत्यादींच्या सहवासांत आनंद मानूं लागला—

आणि 'जादुगार'नें तर त्याच्या आयुष्यांत जादूचीच कांडी फिरवली ! त्याच्या अंतःकरणाला, त्याला नकळत लागलेली तरुणीसहवासाची आकांक्षा तृप्त केली ! दिवसेंदिवस राजाला बुद्धकाळांतल्या चित्तरक्षिता, मुसलमान काळांतल्या रोशनारा, अगर रजपुतांच्या मलयवती रंजवूं शकनात; अगदीं आजच्या काळांतल्या 'जादूगार'च्या इंदुमतीनें तरुणीसहवासाची तळमळ लाग-

ठेल्या राजाच्या भावनाप्रधान अंतःकरणाची पकड घेतली ती घेतलीच ! बिचाऱ्याच्या भोंवतालची परिस्थितीच, त्यानें इंदुमतीच्या काल्पनिक सहवासांत कां होईना, आनंद मानावा अशी होती. घरांत फक्त आईवडील, पूजेला वृद्ध भिकंभटजी, रांपाकाला भार्गव व बाहेर या सर्वांच्यापेक्षां वृद्ध व एकनिष्ठ असे मार्तंड-राव कारकून ! सगळ्या पुरुषांच्या गराड्यांत बिचारा काव्यात्म राजा सांपडला होता ! कुड्डकवाडी मुक्कामीं स्त्रीपुरुषांनीं 'मिक्स्' होण्याचा प्रघातच नसे; त्यामुळें कोणा पोरीसोरींची ओळख होण्याचीही मुष्कील ! ओळखीपैकीं मार्तंडराव काय ते कुटुंबवत्सल, परंतु परपुरुषाशीं बोलण्याचा परवाना बाळगणाऱ्या त्यांच्या माहेर-वाशिणी मुली, पोक्त्यापुरत्या होण्याच्या मार्गाला लागल्या होत्या. सुना तरुण, परंतु त्या अव्वल दर्जाच्या आर्यपतिव्रता असल्यामुळें त्या वर मान करून राजाकडे पहायच्याही नाहींत, शिवाय त्या सर्वांचीं हटकून लग्नें झालेलीं असत ! बरें, नाती होत्या पण त्या अजून झबल्याकुंचड्यांतच ! तात्पर्य काय कीं, राजाला ज्यांच्या सहवासाची तळमळ लागली होती त्या तरुणी ऊर्फ युवती त्याला फक्त पुस्तकांत भेटत ! राजा केव्हां रस्त्यानें जाणाऱ्या कुड्डक-वाडीच्या स्त्रीवर्गाचें निरीक्षण करण्याचें धाडस करी, परंतु तीं दृश्यें मुंबईपुण्याच्या युवतींच्या वर्णनाबरोबर 'टॅली' होत नसत ! ( बिचाऱ्याला काय माहित कीं, खेडेगांवांतल्या बायका अगर फार तर स्त्रिया, याच शहरांतल्या तरुणी अगर युवती होत, व शहरांतल्या यच्चयावत् प्रमदा, मानिनी, ललना, अंगना, मोहना, शोभना, रामा, अभिरामा, ह्याच खेडेगांवांतल्या आयाबाया होत ! खेडेगांवांत तरुणी ही चीज क्वचितच असते व शहरांत आयाबाया नसतातच ! )

अशा विषम परिस्थितींत तरुणींच्या वाङ्मयीन सहवासाच्या

आधारावर राजानें आयुष्याचीं गेलीं तीन वर्षे काढलीं होतीं. त्याची संध्या, गीता, गायत्री म्हणजे जादूगार, दौलत, निरंजन ! त्या वर्णित नायिकांच्या मुखावरील आरक्त छटा, फुगीर गाल, विपुल केशभार, काळ्याभोर पापण्या, धनुष्याकृति भुंवया, सुकुमार बोटें, मुद्रेवरचे मधुर भाव, ब्लाउजच्या कपरेच्या जाड पट्ट्या, लांब्या बाह्या, इत्यादि सौंदर्यस्थळांचीं वर्णनें अगर त्यांच्या माना वळवणें, पदर सांवरणें, श्रांत होणें, वेळोवेळीं बशीच्या कांठावरून पहाणें, अशयांसारख्या कृतींचीं रोमँटिक वर्णनें वाचतां वाचतां राजाची अवस्था, समुद्रकांठची वाळू आपल्या चिमुकल्या मुठीनें भरण्याचा हव्यास करणाऱ्या बालकाप्रमाणें होई ! अगदीं आत्मीयतेनें तन्मय होऊन तीं वर्णनें वाचतांना राजाला कसला तरी उन्मादकारी आनंद होई ! जुहूच्या लाटेंतून भिजलेल्या इंदुमतीला उचलून वर आणतांना स्पर्शसुखाचा जो रोमांचकारी अनुभव खुद्द आनंदरावाला आला नसेल, तो, तें वर्णन वाचतांना राजाला होई ! मंदाकिनीच्या ओठांवरील गूजबेरीचा रंग पाहून जो उन्माद श्रीला चढला नसेल तो राजाला चढे ! कुलाबा स्टेशनवरच्या बांकावर निर्मलेच्या विपुल केशभाराचा स्पर्श झाल्यामुळें जे रोमांच खुद्द अविनाशच्या अंगावर उभे राहिले नसतील ते राजाच्या उभे रहात, व श्रांत झालेल्या मंदाकिनीला मोटारींत झोंप लागली असतां तिच्या मस्तकाचा ‘ सूक्ष्म सुगंध, घेऊन जें ’ नाजुक सौख्य निरंजनला झालें नसेल तें राजाला होई ! हीं सर्व वर्णनें शक्य, सत्य असतील कां ? केव्हां केव्हां त्याचें चित्त शंकाव्याकुल होई; कारण त्याच्या दृष्टीच्या टापूंत कधींच न आलेलीं तीं वर्णनें असत !

परंतु त्या वर्णनांच्या, म्हणजे वर्णित नायिकांच्या रूपसौंदर्याचा नव्हे, परंतु वर्णित रोमँटिक घडामोडींच्या, शक्यतेचा निर्वाळा

देणारा त्याचा एक शहरवासी कॉलेजिएट मित्र होता. शरच्चंद्र जोशी. शरद् लहानपणापासूनच पुण्यास त्याच्या मामाकडे शिकायला म्हणून जाऊन राहिला होता. सुट्टींत तो घरीं आला कीं राजा त्याला अत्यंत उत्सुकतेने पुण्याची, त्याच्या कल्पनेंतल्या त्या Fairylandची, फर्ग्युसन कॉलेजची व तेथील स्त्रीविद्यार्थिनींची माहिती, अर्थात् अत्यंत शितापीनें, विचारी. शरदही मला ती असमकी मिन! असें म्हणाली वगैरे रसपूर्ण वर्णनें सांगे. बिचारा अगदींच विव्हळ होई!

आणि अशा परिस्थितींत मॅट्रिकचा निकाल लागला. फर्ग्युसन कॉलेजमध्यें जायचं ही राजानें अगदीं हृदयाशीं बाळगलेली आकांक्षा, त्याच्या वडिलांनीं एका वाक्यांत चक्काचूर केली, व शेवटचा निर्णय दिला कीं राजानें शेतकी कॉलेजांत जावं! विपुल शेतीवाडी करणाऱ्या पूर्वजांचा राजाला अगदीं संताप आला! ज्या एका अभिनव स्त्रीराज्यांत वावरण्याचे मनोरथ त्यानें बाळगले त्या स्त्री-राज्याच्या मादक सहवासाऐवजीं शेतकी कॉलेजच्या नांगऱ्यांच्या रांकट सहवासाचे आपण आतां धनी होणार! राजा अगदीं रडकुंडीला आला!

  

खिन्न वदनानें आपला आवडता फडक्यांचा 'सेट' बरोबर घेऊन राजाची स्वारी शेतकी कॉलेजांत प्राप्त झाली! आपलें दुर्दैव एकदां कळल्यावर त्याला तीं पुस्तकें विसंबणें शक्यच नव्हतें! नाहीं म्हणायला तो शरदकडे बरेच वेळां जाई तोच काय तो त्याच्या जीवाला विसांवा! त्याच्या आवडत्या लेखनाचा विषय बनलेल्या त्या विशिष्ट स्त्रीजगाविषयीं त्याला वाटणारी कुतूहलपूर्ण उत्सुकता दाबून ठेवणें त्याला अशक्यच होतें. त्याची ती उत्सुकता जोश्याला तर कळलीच; पण एम्. ए. च्या वर्गातील लबाड डोक्याचे नवोदित प्रतिभा-

संपन्न लेखक व जोश्याचे परम मित्र जोगळेकर यांना तर त्याहीपेक्षां जास्त कळली! राजाचा वाचण्याचा नादही जोगळेकरांच्या लक्षांत आल्यावांचून राहिला नाहीं. राजाची लवकरच जोगळेकरांच्या बरोबर बरीच ओळख झाली व थोड्याच दिवसांत त्यानें आपल्या दोन मित्रांना आपल्या रूमवर चहालाही आमंत्रण केलें.

  

राजा तत्परतेनें चहाची तयारी करीत होता, व जोगळेकर त्याच्या पुस्तकांची छाननी करीत होते. फडक्यांच्या कादंबऱ्यांतून ठिकठिकाणीं खुणा, कांहीं उद्गारचिन्हें, तात्पर्य राजा त्या पुस्तकावर 'बहोत खुष' असल्याचे अनेक पुरावे! किंचित् कुतूहलानें जोगळेकरांनीं त्या खाणाखुणांच्या अंतरंगाची छाननी केली.

"नेहमींच मोहक दिसणाऱ्या इंदुमतीच्या चेहऱ्यावर यावेळीं दंवबिंदूंनीं धुतलेल्या पुष्पाप्रमाणें विलक्षण टवटवी आली होती. विस्मयानें प्रश्न विचारल्यावर कांहीं वेळ तिचें तोंड तसेंच उघडें राहून पाळवींतून डोकावणाऱ्या कुंदकळ्यांप्रमाणें तिचे दांत दिसत होते. नाकपुड्या किंचित् प्रसरण पावून वायुलहरींनीं थरारणाऱ्या गुलाबाच्या पाकळ्यांप्रमाणें भासत होत्या. तिच्या नेत्रांच्या नेहमींच्या तेजांत एकप्रकारच्या लाडिकपणाचें मार्दव मिसळल्यासारखें दिसत होतें, आणि तिच्या भुंवयांत नागिणीची मोहक वक्रता आणि चपलता व पुष्पवेलींचा नाजुकपणा एकत्र सांठवल्यासारखें वाटत होतें." अश्यांसारखीं केवळ रूपसौंदर्यवर्णनें अगर सीमोल्लंघनाच्या दिवशीं सीमा सोडण्याचा अविनाशचा निश्चय ऐकून निर्मलेनें गोरामोरा चेहरा केला अशीं रोमँटिक वर्णनें राजाकडून अधोरेखित अगर पार्श्वरेखित केलीं गेलीं होतीं कांहीं ठिकाणीं मजकुराच्या भोंवतालच्या रिकाम्या जागेंत "सुंदर, वर्णनाचा सूक्ष्मपणा" अश्यांसारखे Remarks ही लिहिलेले होते!

" अरे चोरा, " जोगळेकर तीं पुस्तकें परीक्षून मनांत म्हणाले, " हीं वर्णनें वाचून पागल झाला आहेस का ? "

शेवटीं निरंजनमधला एक उतारा सांपडला: " विनोद-वचनाचीं कोमल पुष्पें एकाद्या स्त्रीवर नेम धरून फेंकलीं व प्रतिकाराचा खोटा आविर्भाव आणून तिनें त्यांचा स्वीकारच केला असा प्रत्यय आला म्हणजे पुरुषाला कांहींएक अवर्णनीय सुख होत असतें. " बाजूच्या रिकाम्या जागेंत " अगदीं खरें. " जोगळेकर मनांत म्हणाले, " तुला रे लेका ह्याचा खरेखोटेपणा कसा कळला ? कुक्कुटवाडीच्या वस्तींत विनोदवचनाचा नेम धरायला तरी कोणी भेटलं होतं कां ? "

इतक्यांत राजाचा चहा तयार झाला. जोगळेकर म्हणतात, " अहो राजाभाऊ, तुम्ही वाचनाचे नादी आहांत ही खरोखर आश्चर्याची गोष्ट आहे. आमच्या विद्यार्थ्यांत दिवसेंदिवस General Reading ची संवय किती नाहींशी होते आहे ! "

लज्जेनें राजाभाऊंच्या तोंडावर रक्तिमा पसरली ! जोगळेकरांनीं चहा पितां पितां गंभीर वाङ्मयचर्चा सुरू केली. " आपल्या लोकांची अभिरुचीच विकृत झाली आहे आणि विशेषतः एक-स्वरूपी तर फारच झाली आहे, आणि तिचाच परिणाम असा झाला आहे कीं आपल्या लेखकांच्या लेखनांत विविधता अगर वैचित्र्य नाहीं. "

जोशी नुसता ऐकत होता. जोगळेकरांच्या अंगांत आज वाङ्मयचर्चेचा एवढा संचार का झाला आहे त्याला कळेना ! राजा तर बोलून चालून वाङ्मयभक्तच. त्या नवोदित लेखकाचीं मतें तो आदरभावानें नुसतीं ऐकत राहिला !

" आतां हेंच पहा ना, " जोगळेकरांनीं पुन्हां सुरुवात केली, " प्रेमभंग म्हटला कीं सगळे लेखक त्याचीच री ओढतात.

मृत्यु म्हणजे मृत्यूच ! खरोखर आतां नव्या लेखकांनीं या ठरीव सांच्यापलीकडे जायला पाहिजे आणि," जोगळेकरांचा चेहरा किंचित् आरक्त झाला, "मी माझ्या नव्या कादंबरींत असाच अभिनव प्रयत्न केला आहे. माझी ती कल्पना इतकी नाविन्यपूर्ण आहे – तुम्हांला तर खास आवडेल."

जोगळेकर एक कादंबरी लिहावयास घेणार आहेत एवढी जोश्याला माहिती होती परंतु ती अभिनव आहे, व अत्यंत नाविन्यपूर्ण कल्पना आहे ही बातमी त्याला आजच लागली। "कां हो, मला नाहीं हो हें कधीं सांगितलंत ?" जोश्यानें सरळपणानें प्रश्न केला.

"तुला गणितज्ञाला वाङ्मय कशाला सांगायचं ? त्याला जाणणारा रसिक श्रोता पाहिजे," सफाईनें जोगळेकरांनीं राजाची तारीफ केली ! "खरोखर कल्पनेच्या बाबतींत माझी कादंबरी मराठी वाङ्मयांत क्रांति घडवून आणील अशी माझी खात्री आहे. अहो, स्त्रीराज्यावर लिहिण्याचा प्रयत्न आतांपर्यंत पुष्कळांनीं केला. टेनिसन घ्या, खाडिलकर घ्या, पण सगळयांनीं आपल्या कल्पना एका सांच्यांत भरडून काढल्या आहेत."

स्त्रीजगावर कादंबरी ! राजाचे कान अधिकच उत्सुकतेनें ऐकूं लागले। आधुनिक काळांतल्या स्त्रियांच्या जगांत वावरणारे जोगळेकर, त्यांचीं वर्णनें तर अगदींच सत्य व सजीव असणार ! राजाची उत्सुकता वाढूं लागली ! "माझ्या कादंबरींत सुद्धां पहिल्यांदा सर्व स्त्रियाच असतात व शेवटीं पुरुष येतात. कारण त्यांच्यावांचून चालणंच शक्य नसतं. परंतु या लोकांपेक्षां किती वेगळ्या तऱ्हेनें मी पुरुषांना कादंबरींत आणलं आहे !"

राजाची उत्सुकता पराकाष्ठेला पोंचली !

"खरं का ?" बालकाच्या सरलतेनें राजा म्हणाला.

" कधीं प्रसिद्ध होईल ती कादंबरी ? आपल्याला आवडेल बुवा असलं नाविण्यपूर्ण वाचन ! "

" प्रसिद्ध ? " एकदम जोगळेकर ह्मणतात, " त्याला तर अजून बहुत अवकाश आहे; आतांशीं कुठें पांच प्रकरणं झालीं आहेत. माझ्यासारखा आळशी लिहिणारा, त्यांतून आतां परीक्षा ! कधीं होईल तें होईल. "

राजाचा चेहरा किंचित् पडला !

" एकूण आम्हांला ती लवकर वाचायला मिळत नाहीं तर ? "

" अहो पण इतकं कशाला, तुम्हांला जर तिच्या स्वरूपाचीच कल्पना पाहिजे असेल तर ती झालेल्या पांच प्रकरणांवरूनही येईल कीं ! वाटल्यास तुम्ही असं करा, पुढच्या रविवारीं चहालाच आमच्याकडे या व तिथेंच वाचा तीं पांच प्रकरणें, म्हणजे मला तुमचं मतही कळेल. अगदीं नवीन तऱ्हेचा प्रयत्न आहे, तेव्हां रसिक वाचकवर्गाला कितपत बरा वाटतो तेंही कळेल. "

राजानें अत्यानंदानें त्या बेताला कबुली दिली.

" अर्थात्, तुम्हांला इच्छा असली तरच वाचा हें ! कारण सबंध कादंबरी वाचल्यावांचून कलेची खरी कल्पना येत नाहीं. कांहीं वेळां उत्तरार्धच विशेष तजेलदार असतो. निदान त्या कादंबरींत तरी तसेंच आहे, म्हणून म्हणतों इच्छा असल्यास वाचा. "

" वा वा, हें काय विचारणें ? जरूर येईन पुढच्या रविवारीं. "

त्या मित्रद्वयाला पोंचवायला आलेला राजा परत फिरतांच जोश्यांच्या पाठीवर थाप मारून जोगळेकर म्हणतात,

" मोठे रसिक दिसतात बुवा तुझे कुडूकवाडीकर मित्र ! "

" ए, आतां तुझी वक्रदृष्टि त्याच्यावर फिरली वाटतं ? "

जोशी सहानुभूतीनें म्हणाला.

"अरे, वक्रदृष्टि कसली? जरा गंमत. फार लेकाचा मिटक्या मारून पोरींचीं वर्णनें वाचीत असतो!"

~ ~ ~

आठ दिवस जोगळेकर लिहित होते.

~ ~ ~

आठ दिवसांच्या दीर्घकालानंतर एकदांचा तो रविवार उजाडला! मुळांत राजा रोमॅन्टिक वाङ्मयाचा शोकी, त्यांतून तें स्त्रीराज्याचें नाविन्यपूर्ण वर्णन व जोगळेकरांनीं केलेलें! नवी कल्पना, प्रतिभा, वगैरे शब्दांनीं राजा आपली समजूत घालूं पहात होता. परंतु त्याच्या अंतःकरणांत जें आकर्षण निर्माण झालें होतें तें वेगळ्याच गोष्टीचें. अनेक नवोढा तरुणींच्या सहवासांत आज तो मनमोकळेपणानें रहाणार होता त्यांच्या निरागस लीला पहाणार होता!

एक वाजला नाहीं तों उन्हांतून राजाची स्वारी जोगळेकरांच्या खोलीवर हजर झाली. जोगळेकरांनीं सहास्य मुखानें त्याचें स्वागत केलें. थोड्याफार इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर जोगळेकर म्हणतात, "तुम्ही असं करा ना, इथें स्वस्थपणें वाचीत बसा तोंपर्यंत मी शेजारींच जोश्यांच्या रूममध्यें बसतो. त्यांच्या-बरोबर थोडं जिमखान्याचं काम करायचं कबूल केलं आहे."

राजानें अर्थात् त्यांना विरोध केला नाहीं. जोगळेकर बाहेर गेले. हातांत आलेल्या त्या पांच प्रकरणांच्या हस्तलिखिताकडे राजानें प्रेमभरानें दृष्टि फेंकली! कॉटवरची एक सावरीची मऊ उशी मागें टाकून तो आरामखुर्चीवर ऐटींत पहुडला. स्वतःला शक्य तितकें सुखासीन करण्यासाठीं जोगळेकरांची लिहिण्याची खुर्ची फरकन् ओढून तिच्यावर त्यानें पाय ठेवले. न जाणो स्वतःच्या

वमणाच्या गैरसोईमुळें उत्कृष्ट वाङ्मयाचा रसास्वाद घेतां आला नाहीं अशी गोष्ट न व्हावी! वाङ्मयांतील सुधा आपल्या हातांत आहे व आपण तिचें लवकरच प्राशन करणार या कल्पनेनें मनाचे जे काय प्रकार होत असतील ते सगळे त्याच्या मनाचे झाले. तें अधीर झालें, उत्कंठित झालें, एक का दोन छप्पन्न स्थित्यंतरांतून गेलें. मोठ्या प्रमुदित मनानें राजानें वाचनाला सुरुवात केली.

प्रकरण १ लें

## प्रेमाखातर

"पौर्णिमेचा पूर्ण हिमांशु आपल्या कोमल करजालानें धरिणीला जणूं काय हळुवारपणें कुरवाळीत होता व त्या सुखस्पर्शानें तिला आलेला उन्मादकारी आनंद साऱ्या जगतीतळावर पसरला होता. तिच्या मुखमंडलावर फुललेल्या त्या कोमल स्मितावरून चंद्राच्या स्निग्ध किरणांच्या स्पर्शानें नव्हे तर जणूं काय अमृत-धारांच्या त्या अविरत वर्षावानें तिच्या चित्तवृत्ती बहरलेल्या दिसत होत्या. नृपप्रासादाशीं स्पर्धा करणाऱ्या त्या अभिनव प्रासादाभोंवतालच्या विस्तीर्ण उद्यानाची आल्हाददायकता तर त्या सुधाधारांमुळें शतगुणित झाली होती. त्या उद्यानावरून वहाणाऱ्या वायुलहरी निशिगंधाचा व रात्रीच्या राणीचा मनोज्ञ परिमल दशदिशांना वाहून नेत होता. उद्यानांत शोभेकरितां बसविलेल्या रंगीबेरंगी प्रस्तरश्रेणींना हीरकश्रेणींची शोभा प्राप्त झाली होती"

—वाचतां वाचतां राजाची खात्री होऊं लागली कीं आतां त्या प्रासादतुल्य वाड्यांतून सौंदर्यशालिनी नायिका तर ह्या उद्यानांत येणारच. परंतु शेवटपर्यंत कादंबरींत न येणाऱ्या जोग-ळेकरांचा मनाई हुकूम तोडून, त्यांचा डोळा चुकवून, निदान भिंतीवरून उडी टाकून नायकही तिला भेटण्याकरितां येणार!

"वाड्याच्या एका बाजूकडे सरदारसाहेबांची यौवनारूढा एकुलती एक कन्या रोहिणी हिच्या खोलींतून इलेक्ट्रिकच्या दिव्याचा मंद हिरवा प्रकाश बाहेर येत होता व वाड्याच्या दुसऱ्या बाजूला असलेल्या स्त्रियांच्या दिवाणखान्यांतून विजेचा झगझगीत प्रकाश बाहेर पडला होता. बैठकागालिचे घालून दिवाणखाना सज्ज करण्यांत आला होता.

थोड्याच वेळांत पेटीचा सूर उमटून वातावरणांत विलीन झाला. दिवाणखान्याच्या एका बाजूच्या भिंतीवर उत्कृष्ट सोनेरी फ्रेमचें व सुगंधी पुष्पमाळांनीं मंडित केलेलें श्रीगोमातेचें चित्र होतें त्याला वंदन करून परम गोभक्त मातोश्री अंबिकाबाई कानविंदे कीर्तनाला उभ्या राहिल्या. सरदारीणबाईंच्या खास आग्रहावरून आज त्यांचें वाड्यांत कीर्तन होतें. गोभक्त स्त्रियांनीं दिवाणखाना फुलून गेला होता.

मातोश्रींचें वय अजमासें साठीच्या आंतबाहेर होतें. वार्धक्यामुळें त्यांचे हात थरथर कांपत असल्यामुळें त्यांना चिपळ्या धरण्याची ताकद नव्हती, परंतु सरदारीणबाईंच्या आग्रहामुळें, व प्रेमानें प्रेरित होऊन त्यांनीं त्या हातीं धरल्या होत्या. त्या प्रेमाचें पवित्र तेज, त्यांच्या जरायुक्त चेहऱ्यावर ओसंडत होतें. सृष्टीच्या नियमानुसार त्यांचा आवाज खोल गेला होता, दंतपंक्तींनीं त्यांच्या वदनाचा त्याग केल्यामुळें शब्दोच्चार स्पष्ट होत नव्हता, तरी त्यांनीं त्याची तमा मानली नाहीं.

सुमारें दीड तास कीर्तन झालें ( कीं ज्याचें वर्णन जोगळेकरांनीं रसपूर्ण केलें होतें! ). दिवाणखान्यांत जमलेल्या वृद्ध स्त्रीजनांना जांभया येऊं लागल्या. कोणी डुलक्या घेत होत्या तर कोणी चुटक्या वाजवीत होत्या. दीड तासाच्या शेवटीं 'पुंडलीक वरदा' म्हणून अंबिकाबाईंनीं चिपळ्या खालीं

ठेवल्या. अखिल स्त्रीजनांनीं त्यांच्या चरणयुगलावर मस्तक ठेवून त्यांना वंदन केलें.''

प्रकरण संपलें, राजाच्या चेहऱ्यावर किंचित् उदासीनतेची व आश्चर्याची छटा पसरली; परंतु रोहिणीच्या खोलींतून येणाऱ्या हिरव्या प्रकाशाच्या आधारावर पुन्हां त्यानें रस्ता चांचपडण्यास सुरुवात केली आशा वेडी असते!

## प्रकरण २ रें

# शोध व भेट

रोहिणी नुकतीच मॅट्रिक होऊन फर्ग्युसनच्या रेसिडेन्सींत रहायला गेली होती.

रविवार सकाळ. रेसिडेन्सीच्या सर्व विद्यार्थिनींना आज जणूं काय मनःपूत वागण्याचा परवाना मिळाला होता. नऊ वाजले. लेडी स्टूडंटस्च्या वसतीगृहाच्या बाहेरच्या बाजूला एक टांगा येऊन उभा राहिला. त्यांतून बयोआत्या व अहो (अहो हें कांहीं त्यांचें खरें नांव नव्हे, परंतु भोंवतालच्या मंडळींनीं आदरानें 'अहो अहो' म्हणतां म्हणतां त्यांचें नांवच 'अहो' पडलें!) खालीं उतरल्या. उतरल्याबरोबर 'अयाई ग' असा अहोंच्या तोंडून उद्गार निघाला वयोमानानें आतां त्यांना चढण्याउतरण्याची दगदग म्हणजे जास्तच होती! रामेश्वरच्या यात्रेहून परत जातांना त्या पुण्यास उतरल्या होत्या, व अगत्यानें गोखले प्रोफेसरांच्या घराचा शोध करीत होत्या. ते कॉलेजजवळ रहातात असें कळल्यावरून बिचाऱ्या आर्जवून टांगा करून धडपडत आल्या होत्या. टांगेवाल्यानें त्यांना शोधाखातर इथें आणून सोडलें आंतून तरुणींच्या खिमजली हास्याचे ध्वनी बाहेर स्पष्ट ऐकूं येत होते. त्याच्या अनुरोधानें दोघी चालूं लागल्या. परंतु त्यांचें नशीब बलवत्तर!

आंत जाण्यापूर्वीच त्यांना परटीच्या कपड्यांचा भारा घेऊन बाहेर येणारी धोबीण भेटली. पार्वती गेलीं ४५ वर्षे इथेंच काम करीत होती, त्यामुळें तिला इथली अगदीं खडान्‌खडा माहिती होती.

बयोआत्यांनीं पुढें होऊन तपास केला. "हां त्या कोपऱ्या-वरच्या बंगल्यांत हेती ना गोकले प्रोपेसर." पार्वती म्हणाली.

मंद गतीनें दोघी बंगल्याजवळ पोंचल्या. मोलकरणीनें त्यांना आंतला रस्ता दाखवला. शिताकाकू–तरुण प्रोफेसरांच्या वृद्ध आजी–स्नान आटोपून जपाला बसल्या होत्या. रोहिणी सकाळ-पासून इकडेच आली होती. तिचा व प्रोफेसरांचा विवाह ठरल्या-मुळें त्यांच्या प्रणयक्रीडांना जणूं काय ऊत आला होता. बयोआत्यांनीं तपास केल्यावर रोहिणीनें त्यांना शिताकाकूंच्या खोलींत नेऊन बसविलें. "रोहिणी, कोण ग ?" दूरचं न्याहाळत नसल्यामुळें शिताकाकू म्हणाल्या. "माझ्या ओळखीच्या नाहींत" असें फणकाऱ्यानें म्हणून रोहिणी पसार झाली.

"हें काय शिताकाकू ऽऽ ओळखलें नाहीं का ऽऽ" अहो म्हणाल्या. आवाजावरून शिताकाकूंनीं ओळखलें-हर्षभरानें त्यांनीं जपाची माळ बाजूला ठेवली. "किती वर्षांनीं भेट होत्ये ही बयोआत्या ?"

"तर काय, रामेश्वरहून परत जात होतों, म्हटलें भेटून जावं. आतां देहाचा भरंवसा उरला नाहीं." अंगावरची चौघडी काढून ठेवीत बयोआत्या म्हणतात, "दिवसेंदिवस चालवत नाहीं. ह्या यात्रेपासून तर दम्यानं अशी उसळी घेतली आहे कीं कुठें जायची सुराणी नाहीं उरली. कशी तरी इथपर्यंत आलें झालं."

बयोआत्यांच्या ह्या प्रेमानें शिताकाकूंना अगदीं गहिंवर

आला !

प्रेमाच्या गुजगोष्टींत त्या त्रयींचा किती वेळ गेला तें त्यांना कळलेंही नाहीं. (त्या गप्पांचें, कीं ज्यांच्यांत दुखण्यांच्या हकिकतीच जास्त होत्या, रसाळ वर्णन.) परंतु शेवटीं फार वेळ फरशीवर बसल्यामुळें अहोंच्या पायांतून चमका मारूं लागल्या-मुळें त्या उठल्या ! शिताकाकू त्यांना जेवायला थांबण्याबद्दल आग्रह करीत होत्या. परंतु त्या बंगल्याच्या स्वरूपावरून त्यांना सोंवळ्याओंवळ्याची खात्री पटेना. स्वतः शिताकाकू अलीकडे नेहमीं निरशनाचेंच खात.

"नको शिताकाकू आग्रह. अलीकडे जेवण तरी कुठं पचतंय ! भेटलांत पुष्कळ झालं !" असें म्हणून दोघींनीं गांवाची वाट धरली.

  

निराशा, आश्चर्य, उद्वेग इत्यादींची छटा राजाच्या चेह-ऱ्यावर पसरली, पण अजून रोहिणी होती, तिच्या प्रणयक्रीडा होत्या ! कसाबसा धीर करून त्यानें उरलेलीं तीन प्रकरणें चाळलीं ! रोहिणी व तिच्या तरुण मैत्रिणी राजाच्या थाऱ्याला उभ्या राहीनात. उलट प्रत्येक प्रकरणांत अत्यंत पूज्य, आदरणीय, अनेक दशकें जगांत घालवल्यामुळें आलेल्या अनुभवजन्य ज्ञानाच्या मूर्तिमंत खाणीच (!) अशा वृद्ध आजीबायांचा, पंजीबायांचा घोळका राजाशीं विचारविनिमय करायला उभा ठाकलेला असे !

चिडून राजानें हस्तलिखित टेबलावर आपटलें, तोंच गंभीर मुद्रा करून मंद पावलें टाकीत जोगळेकर शरद् व वसंत गुप्ते यांसह आंत आले !

"अहो काय जोगळेकर !" राजाला अगदीं रहावेना. "ही काय कादंबरी आहे का काय आहे काय ?"

" का हो, काय झालं ?" थंड स्वरांत जोगळेकर म्हणाले. " माझ्या कल्पनेंतलं नाविन्य तुम्हांला आवडलेलं दिसत नाहीं."

" शी !" संतापून राजानें जोगळेकरांचा निषेध केला. " अहो, मनुष्य कादंबरी वाचायला घेतो ती काय या म्हाताऱ्या-कोताऱ्यांचीं कथाकीर्तनें अन् दुखणीं अपचनं ऐकायला कीं काय ?" संतापामुळें राजाचा आवाजही थोडा चढला होता व तोंडावर निराशा व उद्वेग ह्यांचीं स्पष्ट चिन्हें दिसत होतीं !

" का हो, काय भानगड आहे ?" म्हणत वसंत गुप्तेनें जणूं काय खऱ्याच उत्सुकतेनें हस्तलिखित उचललें व भरकन् वाचून टाकलें. आपल्या बाजूला आतां एक गडी येणार ह्या कल्पनेनें राजाला धीर आला !

" का बुवा, त्यांत काय बिघडलं ?" जोगळेकर शांतपणें म्हणतात, " मला तर आजपर्यंत कोणालाच न सुचलेली ठरीव सांच्यापलीकडची कल्पना या दृष्टीनें ती खरोखरच चांगली वाटते, आणि तुम्हांलाही तिच्यांतलं नाविन्य आवडेलसं मला वाटलं होतं !"

" खरंच, पण जोगळेकर," गुप्ते प्रवचन करूं लागला, " म्हाताऱ्या बायांचें काव्यपूर्ण वर्णन करण्याच्या ह्या तुमच्या अभिनव कल्पनेपेक्षां तरुणीचें वर्णन करण्याची जुनाट चुरसलेली कल्पना हजारपट बरी कीं !"

राजाला जास्तच धीर आला !

" हें पहा, मी आहे अभिनवतेचा भोक्ता-परंतु रसिकजनांना आमचा प्रयत्न एकंदर अभिमत नाहींसें दिसतंय !"

" अहो, पण त्या नाविन्याला कांहीं अर्थ ?" राजाच्या अवमानित काव्यात्म वृत्तीनें आतां अगदी बंड पुकारलें ! " या तुमच्या प्रकरणावरून कादंबरींत कोणी नायिका आहेसें वाटतच नाहीं ! काय तीं सारीं म्हाताऱ्यांचीं वर्णनें !"

" नाहीं कशी ? आहे कीं माझ्या कादंबरींत नायिका ! आतां ती पहिल्या पांच प्रकरणांत येत नाहीं हें कबूल–म्हणूनच तर मी म्हटलें होतें कीं कादंबरीचा उत्तरार्ध अधिक तजेलदार आहे. "

" अहो, पण मग तिला अगोदर कां नाही आणलीत वाचकांचे इतके हाल करण्यापेक्षां ! " राजानें पुन्हां बंडाळी आरंभली !

" पण माझी नायिका इतक्या लवकर येऊं शकत नाहीं. " जोगळेकरांचा स्वर गंभीर झाला !

" लांब रहाते बिचारी पंचवटींत ! पतीच्या निधनापासून ह्या मर्त्य जगाचा त्याग करून तिथेंच राहिली आहे ! अपत्यप्रेम सुद्धां बिचारीला माहीत नाहीं; जगांत प्रेमाचें माणूस म्हणजे काय ती एक पुतणी, पहिल्या प्रकरणांतील मातोश्री अंबिकाबाई कानविंदे. अंबिकाबाईचं लालनपालन माझ्या नायिकेनंच केलें. "

" म्हणजे त्यांच्याहीपेक्षां म्हातारी ! " राजा किंचाळलाच !

" जोगळेकर ! " गुप्ते गंभीरपणें म्हणाला, " कोणते पुरुष तुमच्या ह्या अभिनव स्त्रीराज्यांत पाऊल टाकायला धजले ? माझी खात्री आहे तुमच्या ह्या स्त्रीराज्यांतल्या स्त्रियांशीं प्रेमाच्या गोष्टी बोलूं शकणाऱ्या पुरुषांची सबंध पिढी पानिपतच्या लढाईत गारद झाली असली पाहिजे ! "

" पण ते प्रेमाच्या गोष्टी करायला येणारच नाहींत. "

"मग कशाला तडफडायला येणार आहेत ?" राजा गरजला !

जोगळेकर ट्रॅजेडीचा अंत सांगणाऱ्याच्या गंभीर, भावपूर्ण स्वरांत सांगूं लागले, " शेवटच्या प्रकरणांत माझी नायिका श्रीरामस्वरूपीं विलीन होते. त्यानंतर पुरुषांना तिथें येणं प्राप्तच असतें. "

राजानें डोळे फाडून नुसतें वर पाहिलें ! कीर्तनानें सुरुवात

करून प्रेतयात्रेनें कादंबरीचा शेवट करणाऱ्या त्या नवकल्पनावादी कादंबरीकाराच्या डोक्यांत, कोपऱ्यांतल्या दांडग्या "अभिनव" काठीचा अगदीं "नाविन्यपूर्ण" तडाखा देऊन, त्याला कधीं पाहिली होती का नव्हती अशा "नवनवोन्मेषशाली" तिरमिरीचा "क्रांतिकारक" अनुभव आणून द्यावा, असा अगदीं "प्रतिभापूर्ण" मोह राजाला वाटला—

पण महत्प्रयासानें हंसूं आंवरून त्याच्याकडे रोखून पहाणारे सहा डोळे त्याला दिसले! वस्तुस्थितीची पुरती जाणीव त्याला होण्याच्या आंतच त्या तिघांच्या नऊमजली हास्याचा बांध फुटला व पाठोपाठ बाहेरून एक अगर अनेक स्वर पृच्छा करूं लागले, "कां हो जोगळेकर, अहो कसला एवढा हंशा पिकलाय ?"

# संरक्षक !

प्रसन्नचित्तानें समुद्रकांठीं सूर्यास्ताची शोभा पहात बसलेल्या विनायकाला कसा कोण जाणे, पण 'इव्हिनिंग स्टार' विकणाऱ्या पोऱ्याचा आवाज ऐकूं आला, आणि नेहमींचा प्रघात नसतांना सुद्धां खिशांतून पटकन् एक आणा काढून घेऊन त्यानें स्टार विकत घेतला.

वर्तमानपत्रवाचकाच्या बेफिकीरपणानेंच विनायकानें स्टार उघडून त्यावर इकडेतिकडे नजर फेंकली. "**किस्मदाबादचा दंगा**" जाड टाइपांत छापलेल्या शीर्षकाकडे त्याची दृष्टि गेली! विनायक एकदम दचकला—घाबरला! धडधडल्या अंतःकरणानें त्यानें बातमी पुढें वाचली. किस्मदाबादला दंगा झाला होता, दंगा म्हणजे काय प्रसंग असतो त्याची त्याला पुरती कल्पना होती.

विनायकानें बातमी शेवटपर्यंत कशीवशी वाचली. किस्मदाबादला पेटलेल्या दंग्याचा कल्लोळ जणूं काय त्याच्या अंतःकरणांत पेटला! विनायक विव्हळ झाला, बेचैन झाला, समुद्रकांठच्या खडकावर बसलेला असतांही आपला जीव गुदमरतो आहे असें त्याला वाटलें!

धडपडतच तो घरीं आला; रोंध्याकाळच्या संध्याकाळीं आपल्या

व्यापारी कंपनीच्या मॅनेजरला भेटून आठ-दहा दिवसांची रजा मिळवून घरीं येतांच कसेबसे दोन-चार कपडे त्यानें बॅगेंत कोंबले व तडक स्टेशनचा रस्ता धरला !

  

एका वरच्या बर्थवर विनायक पडला होता. तिकिट वगैरे काढून तो व्यवस्थित नेमक्याच गाडींत बसला होता हेंच नशीब, इतका त्याच्या चित्तवृत्तीनें ठाव सोडला होता ! त्याच्या मनाची अभिष्टावस्था त्याच्या हालचालीवरून स्पष्ट कळण्यासारखी होती. तो ह्या कुशीला वळे, पुन्हां त्या कुशीला वळे, कोपरापुढचा हात कपाळावर ठेवून शून्य मनानें दिव्याकडे पाही. संध्याकाळपासून आतांपर्यंत त्याच्या शरीराला सारखी धांवपळ करावी लागल्यामुळें विचाराला फारशी सवडच नव्हती, पण आतां स्वस्थपणें गाडींत बसल्यावर त्याच्या दुःखावेगाला पुन्हां भरती आली ! असहाय्यपणें पडल्यापडल्या हनुवटी किंचित् वर उचलून अगदीं विकल स्वरांत तो म्हणाला—नव्हे, त्याच्या तोंडून शब्द फुटले, त्याच्या नकळत फुटले,—" त्रिवेणी, तुझें कसें झालें असेल ? "

गाडी स्टेशनामागून स्टेशनें टाकीत होती, आणि विनायकाचे पुरुषी अश्रु त्याच्या प्रवासी उशीवर ओघळत होते ! वीस वर्षांच्या कालावधीचा प्रचंड चित्रपट त्याच्या डोळयांपुढें फिरत होता ! आठ वर्षांची त्रिवेणी, अकरा वर्षांचे आपण; वडिलांच्या बदलीच्या निमित्तानें एका गांवीं शेजारीं शेजारीं आलों. अगदीं पहिल्याच वेळीं परकरपोलका नेसून व कानांत मोत्यांचे डूल घालून, आईबरोबर आपल्या घरीं आलेली लाघवी त्रिवेणी आपल्याला आवडली. आपण दोघांनीं मुलांची शाळा, मुलींची शाळा, आपले मास्तर-मास्तरणी, गांवचा लहानसा बाजार, गांवांतलें एक भुताटकी-चें घर, इत्यादि महत्त्वाच्या विषयांवर किती तरी गप्पा मारल्या !

त्रिवेणी जेमतेम मराठी पहिलींत, तर आपण चौथींत असल्यामुळें, अभिमानानें आपण ‘ लघुत्तम ’, ‘ दृढभाजक ’ अशीं मोठमोठीं नांवें घालून आपल्या अभ्यासक्रमाचें वर्णन केलें ! तीही बिचारी आपल्या विद्वत्तेपुढें दडपून गेली !

आणि त्यानंतरचीं चार वर्षें–त्रिवेणीच्या निकट सहवासांतलीं चार वर्षें ! ग्राऊंडवर जाऊन किती खेळलों तरी घरीं आल्यावर अगर सुटीच्या दिवशीं, त्रिवेणीबरोबर पत्ते, सागरगोटे खेळल्या-वांचून मजा नाहीं ! तिच्या अभ्यासाचा मोठा आधार आपण, आणि तिच्या गुणाकार, भागाकारांतल्या Difficulties सोडवतां आल्या नाहींत तर आपल्याला स्वतःचा अगदीं राग येत असे.

पण ते दिवस संपले. त्रिवेणीच्या आईनें तिला नवी साडी आणली होती आणि आतां साडी नेसलेली त्रिवेणी कशी दिसेल याची कल्पनाचित्रें आपण रंगवीत होतों तोंच अचानकपणें आपल्या वडिलांचा प्लेगानें बळी घेतला आणि मामा येऊन आपल्याला आजोळीं घेऊन गेले. एका दिवसांत आपण जणूं काय मोठे झालों ! मामांच्या घरीं आईनें आपल्याला आपली अभ्यासाची जबाबदारी समजावून द्यावी, आपणही मनोभावानें अभ्यासांत पडलों पण पुन्हां पुन्हां त्रिवेणीची आठवण येई ! आपल्याजवळ पाकिट नाहीं, तिकिट नाहीं, कोणाजवळ माग-ण्याचा धीर नाहीं; कारण घरांत परक्यांना पत्रें पाठविण्याचा फारसा प्रघात नाहीं. त्रिवेणीची आठवण आपल्या अंतःकरणांत दबा धरून बसली आहे असें बिचाऱ्या आईला कधीं वाटलेंही नाहीं आणि तेंच स्वाभाविक होतें. आपण शिकत होतों, मॅट्रिक झालों, कॉमर्स कॉलेजमध्यें दाखल झालों. अजून मधून मधून तिला फार भेटावेंसें वाटे; पण भेटणार कुठें ? आणि अशा मनःस्थितींत असतांनाच आपल्याला अवचित ती रस्त्यांत भेटली ! आठ वर्षांची

बालिका त्रिवेणी, आणि अठरा वर्षांची नवोढा त्रिवेणी यांच्यांत किती तरी अंतर होतें! आतां ती साडी नव्हे, तर हिरवेंगार जरीचें पातळ नेसली होती. तिच्या हातांत मोत्याच्या बांगड्या होत्या आणि गळयांत मंगळसूत्र होतें. ती एकटीच होती. आपल्या खोलीपासून थोड्याच अंतरावर आपण होतों, म्हणून आपण साहजिकच तिला आपल्याकडे येण्याचा आग्रह केला. तिनें थोडा विचार केला, कसला तरी निश्चय केल्यासारखें "बरं, चल येतें" असें एकदम म्हणाली आणि आली. तिनें पूर्वीसारखें मोकळया मनानें बोलावें म्हणून आपण किती खटपट केली, पण त्या खटपटीला यश आलं नाहीं! थोड्याच दिवसांपूर्वी इंग्लीश सातवीं-तून तिचें लग्न झालें होतें; पण नववधूच्या आनंदाचा तिच्या मुद्रेवर मागमूसही नव्हता! आपण तिच्या यजमानाची ओळख करून घेण्याची इच्छा दर्शविली; पण ती गोष्टही तिनें टाळली. एका तासानें ती जायला निघाली. "पुन्हां केव्हां भेटशील?" आपण तिला थोडासा अधीर प्रश्न केला. मनांतलें तुंबळ युद्ध चर्येवर न दाखविण्याचा प्रयत्न करीत ती विषण्णपणें हंसून म्हणाली, "विनू, आतां काय लहानपणचे दिवस आहेत का असें नेहमीं नेहमीं भेटायला?" तरी पण तिच्यानें राहवेना! अगदीं दाराजवळ जाऊन ती पुन्हां परतली, आणि आपल्याकडे लक्षपूर्वक पाहत म्हणाली, "विनू, तुला कधीं भेटायला बोलावलं तर येशील ना?" आपण अगदीं हतबुद्ध झालों! तिच्या चमत्कारिक वर्तनाचा अर्थ कळेना, विचारतां येईना! ती सुखी नाहीं एवढाच निष्कर्ष आपण काढला; पण त्या निष्कर्षानें आपल्याला कसली तरी आत्यंतिक तळमळ लावली!

ती परत गेली; आपल्या मनांत आलें, लहानपणच्या त्रिवेणींत एकट्या गंगेची विशुद्धता होती, आतांच्या त्रिवेणींत यमुनेची गंभीर-

ता आणि सरस्वतीचा छन्नीपणा येऊन ती अगदीं सार्थनाम झाली आहे !

  

त्याहीनंतर तीन वर्षे गेलीं. आपला-तिचा पत्रव्यवहार नव्हता, परंतु तिची बातमी लागत असे व पुण्याहून ती अनेक वेळां मुंबईस येत असल्यामुळें मधून मधून बरेच वेळां भेटही होत असे. श्रीमंत व्यसनी नवऱ्याच्या तडाख्यांत तिच्या सुखाची होळी झाली होती ! त्या संसारांत तिनें पांच वर्षे काढलीं; शेवटीं एके दिवशीं अवाचित आपल्याला तिचें पत्र आलें, " बस झाला आतां संसार ! मी शिकणार आहे ! त्यांनीं मला वाटेल तें करायला परवानगी दिली आहे, त्याचा फायदा घेऊन त्यांना सोडून मी मुंबईस येणार आहे ! आईला, बाबांना माझं हें वागणं आवडणार नाहीं आणि त्यांच्याकडे जाऊन त्यांच्या दुःखाला कारण व्हावं असंही मला वाटत नाहीं. मी मुंबईस आलें तर तूं मला मदत करशील का ? "

आपण तिला स्टेशनवर आणायला गेलों. कमाल कृशतेमुळें तिच्यांत पूर्वीच्या रूपसौंदर्याचा मागमूसही उरला नव्हता ! तिच्या वृत्तीनें सागराची गंभीरता आणि प्रक्षुब्धता या दोहोंनाही सामावून घेतलें होतें. आपल्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले, पण तिनें आपली गंभीरता सोडली नाहीं !

तिनें जे. जे. स्कूल ऑफ आर्टसमध्यें नांव घातलें आणि अभ्यासाला सुरुवात केली, आणि आपण एम्. कॉम्. होऊन नोकरी करूं लागल्यामुळें आपल्याला मुली ' सांगून ' येऊं लागल्या. आपण निर्विकार अंतःकरणानें मुली पहात होतों; पण सागराचें सौंदर्य रोज डोळे भरून पाहणाराला नदीतलावाचें आकर्षण वाटतें का ? आपल्याला कळलें, पुरतें कळलें कीं आपण त्रिवेणीवर प्रेम करतों आहों ! तिच्या

मनाचा थांग मात्र आपल्याला कधींच लागला नाहीं. त्रिवेणी ही व्यक्ति वगळून उरलेल्या उभ्या दुनियेबद्दल आपण गप्पा मारीत असूं आणि जों जों आपल्याला तिच्या मनाचा पत्ता लागत नव्हता तों तों तिच्याबद्दलच्या कसल्या तरी गूढ आकर्षणानें आपण जणूं काय भारलें जात होतों! तिच्यांत प्रेमळपणा होता पण त्याबरोबरच कसला तरी चमत्कारिक अलिप्तपणा होता, आणि त्याच्याच मदतीनें ती आपल्याला तिच्या वैयक्तिक आयुष्यापासून दूर ठेवूं शकत असे. आपल्याला अगदीं वेड लागण्याची पाळी आली!

अखेर एके दिवशीं आपण आपली भावना तिला स्पष्ट बोलून दाखविली, पण तिला कांहींच आश्चर्य वाटलसं दिसलें नाहीं, रागही आला नाहीं! त्यानंतर दोन वर्षें ती मुंबईत होती आणि तिच्या सान्निध्याच्या त्या कल्पनेवर आपण दिवस काढीत होतों! एक दिवस आपण ही गोष्टही तिला सांगितली, तरी त्याचेंही तिला आश्चर्य वाटलें नाहीं! 'हं!' असं म्हणून ती किंचित् उपरोधिक हंसली, आणि आपण जी गोष्ट शद्बांनीं तिला सांगितली तीच गोष्ट तिच्या प्रेमळ निर्भय दृष्टीनें आपल्याला सांगितली!

आणि तरीही आपल्याला तिच्या अलिप्तपणाची केव्हां केव्हां भीति वाटे!

तिच्या सहवासांतलीं तीं चार वर्षें—आपण जणूं काय स्वर्ग-सुखांत ते दिवस घालवले! ती पास झाली, नोकरीची खटपट करूं लागली. मध्येंच एक दिवस तिनें त्या किस्मदाबादच्या 'पोस्ट'-ची बातमी आणली. आपले पांच प्राण कासाविस झाले! 'किस्मदा-बादला जावें का?' असें मत विचारायला ती आली होती.

"तुला असं विचारवतं तरी कसं त्रिवेणी?" बोलतां बोलतां आपण भावनेच्या तीव्रतेनें तिच्याजवळ गेलों. "कुठं जातेस? इतक्या लांब परक्या देशांत एकटी कशी राहशील? त्रिवेणी,

जगताच्या संकटापासून तुझं संरक्षण करण्याचा सुद्धां माझा अधिकार नाहीं का ? "—आपण देहभान विसरलों, दोन्ही हातांनीं तिचे हात घट्ट धरले, ते डाव्या हातांत घेऊन उजव्या हातानें तिची हनुवटी वर उचलली, तिच्या डोळयांत एकाग्रतेनें पाहिलें. आपल्याला वाटलें कीं ती दूर होण्याचा प्रयत्न करील, पण तिनें केला नाहीं ! तिचे प्राण तिच्या डोळयांत उतरले होते; तिची निश्चल, निर्भय दृष्टि आपल्याकडे लागली होती !

—आपणच दूर झालों !

दुसऱ्या दिवशीं त्रिवेणी आपल्याला न भेटतां किस्मदाबादला निघून गेली !

आणि गेल्यावर एक लांबलचक पत्र पाठवून तिनें क्षमेची याचना केली. " विनू, मी अशी एकदम आलें, तुला राग आला असेल. पण कां आलें—नाहीं, मला तें सांगतां येणार नाहीं. पण तूं मात्र मला क्षमा कर, नव्हे करशीलच." आणि त्यानंतर आपला नियमित पत्रव्यवहार सुरू झाला.—विनायकाच्या विचारमालिकेवर शेवटचा पडदा पडला; पण रात्रभर त्याची जागच्या जागीं तळमळ चालली होती.

  

तिसऱ्या दिवशीं सकाळीं विनायक किस्मदाबादच्या स्टेशनवर उतरला. दंगा आतां चांगलाच शमला होता. एका हिंदु कुटुंबाच्या शेजाराला त्रिवेणी एकटीच राहत असे. टांगा थांबला. विनायकानें खालीं उडीच टाकली आणि धांवतच जिना चढून तो वर गेला.

आई, बाप, नवरा, सगळीं प्रेमाचीं मनुष्यें जिवंत असतांना स्वतःच्या मानीपणामुळें असहाय, निराधार झालेली त्रिवेणी एका खिडकीशीं अगदीं सचिंत उभी होती.

एक-दोन सेकंदच विनायक थबकला ! आठ वर्षांची बालिका त्रिवेणी त्याला आवडत होती; अठरा वर्षांच्या नवोढा त्रिवेणीबद्दल त्याला आकर्षण वाटत होतें; पण आज अठ्ठावीस वर्षांच्या तरुणी त्रिवेणीला पाहिल्यावर त्याच्या अलोट प्रेमाच्या लाटेनें उसळी घेतली! त्याला वाटलें, धांवत जाऊन तिला घट्ट हृदयाशीं धरावी, हळूंच तिच्या कानांत सांगावें, " तूं जगांत एकटी नाहींस. मी आहे. "

पण दुर्दैवी विनायक त्या सुखाचा अधिकारी नव्हता ! एकदम त्याला त्याच्या मागच्या भेटीची आठवण झाली. जागच्या जागींच तो स्तब्ध उभा राहिला.

त्रिवेणीने वळून पाहिलें, " विनायक, तूं आलास ? " एका वाक्यांत तिच्या डोळयांत अश्रू उभे राहिले ! भिंतीच्या आधारानें उभे राहून त्रिवेणीनें मनसोक्त हुंदके दिले.

  

आल्यापासून विनायकानें त्रिवेणीच्या मागें लकडा लावला होता, " मुंबईस चल ! " त्रिवेणी म्हणे, " अरे, आतां काय गांवाला जायचं ? दंगा तर संपला सुद्धां ! "

दुपारीं विनायक त्रिवेणीच्या छोट्या तीन रूम्सची पाहणी करीत होता. तिच्या बेडरूममध्यें एक मोठी स्पिरीटनें भरलेली बाटली होती. एक अमंगळ कल्पना विनायकाच्या डोक्यांत चमकून गेली ! " त्रिवेणी, ही बाटली कशाला इथं ? "

" कशाला ? " त्रिवेणी म्हणाली, " तुला कळत नाहीं का विनायक ? दंग्याचे दिवस, प्रसंग आलाच असता, तर त्या बाटलीनंच मला तारलं नसतं का ? " तीन दिवसांपूर्वींचें भीषण दृश्य त्रिवेणीच्या डोळयांपुढें उभें राहिलें, एकदम डोळे मिटून तिनें शहारे दिल्यासारखें केलें !

विनायक अगदींच व्याकुळ झाला. तिच्या अगदीं जवळ

जाऊन तिच्याकडे रोखून पाहत तो म्हणाला, " जग सोडून जाणार होतीस? कुणाच्या परवानगीनं? मुंबईहूनही मला न भेटतां आलीस! किती कठोर आहेस त्रिवेणी!"

त्याच्याकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहत त्रिवेणी हळूंच म्हणाली, "मी कठोर आहे विनायक? का दुर्दैवी आहे?"

विनायक विरघळला!

पण त्यानें आपल्या मुंबईस जाण्याच्या प्रश्नाचा पिच्छा सोडला नाहीं! कांहीं वेळानें त्याची " आतां केव्हां निघायचं?" अशी भाषा सुरू झाली.

" अरे, इथं इतकीं हिंदु कुटुंबं आहेत, तीं सारीं गांवाला का गेलीं?" त्रिवेणी म्हणाली.

विनायकाला अगदीं निर्वाणीचा संताप आला! " असं कशाला त्रिवेणी? तुला यायचं नाहीं असं स्पष्ट का म्हणेनास?"

" तसं म्हटलं तर जाशील परत?" त्रिवेणी किंचित् हंसण्याचा प्रयत्न करीत म्हणाली.

" नाहीं जाणार!" विनायक एकदम निश्चयाच्या स्वरांत म्हणाला, " तुला नेईन तरच जाईन, नाहीं तर इथंच राहीन. पण तुला एकटीला अशा परिस्थितींत सोडून जाणार नाहीं."

" विनायक, इतकीं वर्षं मी जगांत काढलीं; अजून मला स्वतःला संभाळतां येत नाहीं असं तुला वाटतं?" कांहीं तरी बोलायचें म्हणून ती बोलली. पण तिची वृत्ति ठिकाणावर नव्हती! अथांग सागरावर तुफान वादळ होत आहे असा विनायकाला भास झाला! त्रिवेणी बोलण्याचा प्रयत्न करीत होती पण मनाच्या क्षुब्धतेमुळें तिचे शब्द तुटक तुटक येत होते!

" विनायक, तूं माझं संरक्षण करण्याचा पत्कर घेतो आहेस? अन् तेवढ्याकरतां इथं आलास?"

" अर्थात् ! " विनायकानें उत्तर दिलें. त्यांत आत्मविश्वास होता.

भोंवतालच्या परिस्थितीचें सर्वस्वीं आकलन केलेल्या एखाद्या तत्त्वज्ञान्याप्रमाणें त्रिवेणी किंचित् हंसली. " तूं, तूं माझं संरक्षण करणार ? "

" कां ? असं कां विचारतेस त्रिवेणी ? "

" विनायक, अगदीं खरं सांगूं ? मला परदेशांत भीति नाहीं, दंग्यांत भीति नाहीं; उभ्या जगांत मला एकाच व्यक्तीपासून धोका आहे, त्या व्यक्तीपासून माझं संरक्षण तूं करशील ? "

" कुणापासून ? कुणापासून सांग ! " विनायकानें अधीर प्रश्न केला. तिच्या उत्तराकडे त्याचे कान अगदीं लागून राहिले होते.

" कुणापासून ? " त्रिवेणी एकदम म्हणाली. " तुझ्यापासून ! " आरामखुर्चीवर बसल्या जागीं एकदम विनायकानें मागें मान टाकली ! दोन्ही हातांनीं तोंड झांकून तो म्हणाला, " त्रिवेणी, मी इतका वाईट आहे का ? "

त्रिवेणी किंचित् हंसली. " तूं वाईट नाहींस, विनायक, उलट जास्त चांगला आहेस. पण मी प्रेमी आहे. " तिचे शद्ब आतां अगदीं स्पष्ट अस्खलित येत होते. आज इतकीं वर्षें आपल्या हातानें आपल्या भावनेला घातलेला दगडी बांध तिनें जणूं काय त्याच हातानें निश्चयानें फोडून दूर केला ! " विनायक, किती वेडा आहेस ! तुला वाटतं माझ्या सौंदर्यामुळें मला जगाकडून धास्ती आहे ! तुला असं कळत नाहीं कीं, जगांत दुसऱ्या कोणी अतिप्रसंग केला तरी त्याची भीति नाहीं, कारण त्या वेळीं माझी प्रतिकाराची शक्ति कायम असते, मेंदु जागा असतो, हृदयाचे ठोके नियमित पडत असतात. पण विनायक, तुझ्या स्पर्शांत माझ्या शारीरिक आणि मानसिक विरोधी शक्तींचा लोप

करण्याचं सामर्थ्य आहे, तें तुला कळत नाहीं ! कांहीं वर्षं स्वतंत्र जगांत काढून, इतर अनेक संकटांना दूर ठेवण्याचं सामर्थ्य मी कमावलं आहे; पण तूं जवळ आलास कीं, पांच वर्षांच्या विवाहित आयुष्यांत सुद्धां जें जीवनसर्वस्व मी दुसऱ्याच्या हातीं लागूं दिलं नाहीं, तें जीवनसर्वस्व तुला अर्पण करावं असा मोह होतो ! तूं दूर असलास कीं सहारा वाळवंटासारख्या भास-णाऱ्या माझ्या मनोवृत्ती तुझ्या सहवासांत चैतन्यानं फुलतात. जगाला वाटतं मी पतिव्रताधर्म पाळते आहे, पण तुझ्यापुढं हजारों वर्षांच्या संस्कृतींचे पाश खिळखिळे होतात—पातिव्रत्याची कदर वाटत नाहीं. असं वाटतं, तुझ्या-माझ्यामध्यें कोणी येऊं शकत नाहीं ! —धर्म नाहीं, नीति नाहीं, जग नाहीं, कुणी, कुणी नाहीं ! ! ” बोलतां बोलतां त्रिवेणी भावनेच्या आहारीं जात होती ! विनायका-कडे लक्षपूर्वक टक लावून पाहत ती म्हणाली, “ आतां सांग विनू, जगापासून माझं संरक्षण तूं करशील, पण तुझ्या-पासून—नव्हे माझ्यापासून, माझं संरक्षण करणं तुला शक्य आहे का ? ”

हतबुद्ध होऊन विनायक त्रिवेणीच्या निर्भय मुद्रेकडे पाहत होता. आपल्या तंद्रींतून तो किती तरी वेळानें जागा झाला ! थोडा वेळ थांबून तिच्याकडे निश्चल दृष्टीनें पाहत तो शेवटीं म्हणाला, “ त्रिवेणी, इंद्रधनुष्याच्या रंगछटा निर्माण करून सराव-लेल्या हातांनीं तर परमेश्वरानं तुझं मन नाहीं ना घडवलं ? ”

# स्त्री-स्वातंत्र्यवादी !

जगदीश सुंदर नव्हे, परतु उमदा, सुदृढ व खऱ्या खिळाडू वृत्तीचा ध्येयवादी तरुण होता. वृन्देनें त्याच्याबरोबर तीन वर्षें कॉलेजमध्यें काढलीं, पण त्यांची कधीं विशेष मैत्री अशी झाली नाहीं. प्रिव्हीयसपासून विद्यार्थिनींच्या सहवासांत येण्याकरतां धडपडणाऱ्या व त्यांच्या मैत्रींतच मोक्ष मानणाऱ्या मामुली विद्यार्थ्यांचा घोळका तिच्या खऱ्या आदराला कधींच पात्र झाला नाहीं; परंतु त्याच्याबद्दल मात्र वृन्देला मनापासून आदर वाटे. उदात्ततेला वश होणारें स्त्रीतत्त्व भोंवतालच्या सौंदर्यपूजक रसिकांचा तट फोडून त्याच्याकडे आकर्षित केलें जात होतें, पण त्याची खुद्द तिला जाणीव नव्हती.

जगदीश खरा ध्येयवादी होता. बडबड कमी, कामाचा उरक जास्त. त्यानें कोणतेंही काम हातांत घेतलें कीं, त्या विशिष्ट चळवळीला एकप्रकारची भव्यता प्राप्त होत असे. कॉलेजांतल्या रसिकगणांच्या दृष्टीनें कॉलेजांतलें आयुष्य म्हणजे जन्माच्या महोत्सवाचे प्रकर्षाचे क्षण, त्याच्यापुढें आयुष्यांतल्या आनंदाला उतार लागायचा; त्याच्या दृष्टीनें त्या ध्येयसोपानाच्या महत्त्वाच्या पायऱ्या होत्या. त्याच्या कार्यव्यापृत मनानें भोंवतालच्या सौंदर्यतत्त्वांची कधीं

दरकारच केली नाहीं.

जगदीश एम्. ए. होऊन कॉलेज सोडून गेला त्या वेळेस वृन्दा सिनीअर बी. ए. च्या वर्गांत होती. " आपलें कॉलेज अलीकडे असें निर्जीव कां झालंय् ? " ती आपल्या एका मैत्रिणीला एक दिवस म्हणाली. " इश्श, निर्जीव व्हायला काय झालंय ! चांगलं मजेंत चाललंय कीं ! परवांच्या गॅदरींगच्या दिवशीं तर आम्ही किती मजा केली ! " मानेला हिसडा देऊन नलिनी इनामदार म्हणाली.

" हो, पण गेल्या वर्षीसारखं नाहीं बाई वाटलं. " पुन्हां वृन्देनें विरोध केला. " अगदीं तस्सं होतं. फक्त गेल्या वर्षीचे ते जोशी नव्हते मनोभावानें सगळीं कामं चोख करायला. त्यानं घोटाळा फार झाला. खरा ध्येयवादी आहे नाहीं, अग तो जगदीश जोशी ? " सहज विरोध करतां करतां नलिनीनं त्याचा उल्लेख केला। वृन्देनें एकदम उत्सुकतेनें चौकशी केली, " म्हणजे काय, तुला ग कसा कळला त्याचा ध्येयवाद ? "

" तुला माहीत नाहीं वृन्दे ? कॉलेज सोडल्याबरोबर त्यानें एक संस्था काढली आहे. स्त्रियांच्या स्वातंत्र्याचा पुरस्कार करणं, त्यांना कायद्याबाबत सल्ला देणं, अन्यायी कायद्याविरुद्ध मोहिम करणं अशा अनेकविध अंगांनीं ती संस्था काम करीत असते. एक वर्ष नाहीं झालें तोंच त्यानें नांवारूपाला आणलीन् कीं संस्था. खरंच कुठल्याही कार्यांत चैतन्य निर्माण करायला त्या जगदीश जोश्यासारखीं माणसंच पाहिजेत, नाहीं ? "

तें संभाषण वृन्देच्या डोक्यांत कितीतरी वेळ घोळत होतें.

  

वृन्दा बी. ए. झाली त्याच सुमारास तिच्या वडिलांनीं तिच्याकरतां एक स्थळ पाहिलें. वृन्देला कसेंसेंच वाटलें, लग्न

करूं नयेसें वाटलें; कारण मात्र कळत नव्हतें. लाडिक स्वरांत ती आईला म्हणाली, “का ग आई, मला घरांतून घालवायची इतकी कां तुला गर्दी झाली?” “इश्श, गर्दी कसली वृन्दा! पण आतां बावीस वर्षांची झालीस कीं! का आतां नव्या पंथाप्रमाणं लग्नच करायचं नाहीं?” प्रेमळपणानें हंसून सरस्वतीबाई म्हणाल्या.—बिचाऱ्या जुन्या पंथांतल्या सरस्वतीबाई! नव्या पंथाप्रमाणें लग्नच कां करायचं नसतें तें त्यांना काय कळणार?

“तसं नाहीं हो, आई,” किंचित् थांबून वृन्दा म्हणाली, “मला आपलं लग्न करायचंच आहे, पण आजच नको. दोन-चार वर्षांत मी कांहीं एकदम नाहीं मोठी होणार आई!”

समजुतदार विनायकराव कन्येच्या मर्जीबाहेर गेले नाहींत. वृन्दा एल्‌एल्. बी. चा अभ्यास करीत होती. स्त्रियांच्या हक्काचे व स्वातंत्र्याचे प्रश्न अलीकडे तिच्या डोक्यांत फार जोरानें घोळूं लागल्यामुळें कायद्याच्या माहितीच्या दृष्टीनेंच तिनें हा मार्ग पत्करला व त्याबरोबर स्त्रियांच्या जीवनाची खरी कल्पना यावी म्हणून स्त्रियांच्या एका संस्थेंत ती कामही करूं लागली.

आपल्या कामांत वृन्दा अगदीं रंगून गेली होती. त्या विषयाचें तिच्या दृष्टीनें नाविन्य व तिला त्या विषयाबद्दल वाटणारा जिव्हाळा या दोहोंचा परिणाम तिच्या कामावर होऊन थोड्याच दिवसांत ती संस्थेचा प्रमुख घटक झाली. एकाच स्वरूपाच्या व जोडीनें काम करणाऱ्या संस्था असल्यामुळें कामानिमित्त तिचा व जगदीशचा केव्हां केव्हां पत्रव्यवहारही होई.

वृन्देला कळलें कीं, कॉलेजमध्यें नलिनीनें केलेलं भविष्य तंतोतंत खरें ठरलें आहे. जगदीशनीं स्त्रीस्वातंत्र्यवादाच्या प्रश्नांतच जिवंतपणा आणला होता. त्याच्या कामाची सर्वतोमुखी

स्तुति होत होती.

वृन्देचा आदर द्विगुणित झाला !

आणि थोड्याच दिवसांत जगदीशचें त्याच्या संस्थेच्या वार्षिकोत्सवानिमित्त व्याख्यान देण्याकरतां तिला आमंत्रण आलें. वृंदेनें तावडतोब होकार दिला.

  

स्टेशनवर जगदीश तिला न्यावयाला आला, त्यानें कॉलेजची ओळखही दिली. संस्थेचा चिटणीस या नात्यानें व्याख्यातीच्या उतरण्याची सोयही त्यानें आपल्याच घरीं केली होती. जगदीशचा छोटा बंगला गांवाबाहेर होता व संस्थेची इमारत गांवांत होती. सकाळपासून जगदीश गांवांत जाणार होता व संध्याकाळीं परत तिला नेण्याकरतां बंगल्यावर येणार होता.

आजचें आपलें व्याख्यान कसें होईल याची वृन्देला नुसती काळजी लागून राहिली होती ! आजपर्यंत तिनें किती तरी व्याख्यानें दिलीं होतीं, पण व्याख्यानाची इतकी काळजी जन्मांत तिला आज पहिल्यांदांच वाटली.

  

तिचें व्याख्यान त्या दिवशीं अतिशय सुंदर व परिणामकारक झालें. स्त्रीजीवनविषयक प्रश्न सोडविण्याची अंतरींची कळकळ तर त्यांत होतीच, पण कसल्या तरी अज्ञात कारणामुळें त्या व्याख्यानाबद्दल आज आपल्याला अतिशयच जिव्हाळा वाटत आहे असा तिला भास झाला ! तिच्या प्रत्येक कृतींतून उल्हास तर नुसता ओसंडत होता !

व्याख्यान संपल्यावर सगळया कामाची निरवानिरव करतां करतां चिटणीसमहाराजांना सात वाजले. जगदीश व वृंदा पायीं बरोबरच घरीं यायला निघालीं. आजच्या व्याख्यानाला कार्या-

बद्दलची कळकळ बाळगणारी इतकी सुविचारी व्याख्याती लाभल्या-बद्दल जगदीशला मनापासून आनंद झाला होता.

त्यांनीं चालायला सुरवात केली तोंपर्यंत आकाशांत पूर्ण-चंद्राचा उदय झाला. टिपूर चांदण्यांतून गांवाबाहेरच्या निवांत रस्त्यांतून तीं दोघें चालत असतां, रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं असलेल्या बंगल्यांच्या बागांतून येणारा, निशिगंधाच्या, रातराणीच्या परिमलाचा झोत त्यांच्या अंगावरून जात होता. हळूहळू तिच्या वृत्तींत कसली तरी पर्याकुलता येत होती.

चालतां चालतां जगदीश मुक्तकंठानें वृन्देची, तिच्या कार्यप्रवणतेची, तिनें जोरदार भाषेंत मांडलेल्या मुद्यांची स्तुति करीत होता. स्तुतिप्रिय स्त्रीजातींत जन्म घेऊन सुद्धां तिचें त्या 'तसल्या' स्तुतीकडे लक्ष लागत नव्हतें! त्या वेळीं, त्या क्षणाला, तिला त्याच्याकडून तिच्या बौद्धिक जीवनाचा गौरव-पूर्वक उल्लेख अप्रिय वाटत होता! त्याच्याकडून आपल्या वैयक्तिक जीवनाची कातर पृच्छा व्हावी अशी आकांक्षा कुठेंतरी खोल मनांत अस्तित्वांत होती. आणि ती जों जों तृप्त होत नव्हती, तों तों तिच्या मनोवृत्ती अस्थिर होत होत्या. तिला त्याच्या ध्येयनिष्ठेचें कौतुक वाटलें; पण मुळांत ध्येयवादी असलेल्या तरुणाला आपल्या सहवासांत कांहीं क्षण आपल्या ध्येयाचा विसर पडावा व त्याला आपण पुन्हां ध्येयप्रवृत्त करावें, अशी तरुणींची आकांक्षा असते—तिची ती आकांक्षा अतृप्त राहिली.

तिच्या मनोवृत्ती ठिकाणावर नाहींत, हेंही त्याला कळलें नाहीं, इतका तो विचारांत गढला होता.

तीं दोघें घरीं आलीं. व्याख्यानाला जातांना ज्या अभा-वितपणानें तिच्या मनोवृत्ती प्रफुल्ल झाल्या होत्या, त्याच अभा-

वितपणानें त्या परत आल्यावर किंचित् त्रासिक व चिडखोर झाल्या! वास्तविक ती दुसऱ्या दिवशीं सकाळीं परत जायला निघणार होती. पण परत आल्यावर तिचा बेत फिरला! "आज रात्रीच्याच गाडीनं जावं म्हणते" ती जगदीशला म्हणाली.

"कां? उद्यां जायचं ठरलं होतं ना?" तो अगत्यपूर्वक म्हणाला. "नको, आजच जाते." त्रोटक शब्दांत वृन्देनें आपला निश्चय जाहीर केला! जगदीशनें आढेवेढे घेऊन पण अखेर संमति दिली!

वृन्दा जास्तच त्रासिक झाली!

जगदीश तिला पोंचवायला स्टेशनवर गेला, पुन्हां एकदां गौरवपूर्वक शब्दांत त्यानें तिचे आभार मानले व गाडी सुटली.

ती परत आली. वत्सल मातेला वाटलें, प्रवासाचा शीण झाल्यामुळें मुलगी त्रासली आहे! आपल्याला काय हवें तें नीट कळत नाहीं, कळलें तर मिळत नाहीं, आणि हें मनाशीं सुद्धां कबूल करायला मानीपणा आड आल्यामुळें धड सुखही नाहीं, धड दुःखही नाहीं, अशा मनाच्या चमत्कारिक अवस्थेंत अकारण प्रफुल्लितपणा व अकारण चिडखोरपणा या दोन अवस्थांत मनुष्याचें मन आंदोलन घेत असतें तशी तिची स्थिती झाली होती— आपल्या मनोवृत्ती कांहीं चमत्कारिक तऱ्हेनं थारेपालट करताहेत याची आतां वृन्देला पुरती जाणीव झाली.

  

आपल्या अंतर्मनाचा शोध घ्यायला वृन्देनें सुरवात केली, व तो पुरता लागावा असाच ईश्वरी संकेत होता! आपल्या संस्थेच्या कामाकरतां वृन्देच्या संस्थेंत जगदीश एक महिना मुक्काम करणार होता, आपल्या कामांत आपल्याला मदत करण्या-

बद्दल त्यानें वृन्देची विनंतिपूर्वक याचना केली.

रोज ती त्याच्या कामाला मदत करायला जाऊं लागली. शेवटीं आपल्या धडपडणाऱ्या, चिडचिडणाऱ्या मनोवृत्तींचें निश्चित स्वरूप तिला कळलें! तिच्या वागण्यांत व वृत्तींत एकप्रकारची निर्भयता व स्थिरता येऊं लागली. जगदीशला ती अगदीं मनोभावांनीं मदत करी. त्याच्या उमद्या चेहऱ्यावरची बुद्धिमत्तेची झांक व सात्विक तेज पाहतांना तिला दुनिया तुच्छ वाटे! "हें सुख मला जन्माचं मिळेल का?" तिनें स्वतःला प्रश्न केला.

आणि त्याच सुमारास तिच्या दादांनीं एक गुणरूपसंपन्न वर तिच्याकरतां शोधून आणला,

सकाळपासून ती विचार करीत होती, शेवटीं मनाशीं म्हणाली, "ही खोटी लाज कां? मला जें वाटतें तें बोलायची चोरी कां?" वृन्दा कराला तरी निश्चय केल्याप्रमाणें घरांतून बाहेर पडली.

एका टेबलाशीं त्या दिवशीं त्या दोघांनीं तासभर काम केलें. ऑफिसमध्यें तीं दोघेंच होतीं. नेहमींप्रमाणें घरीं जाण्याकरतां उठण्याऐवजी हाताचीं कोपरें टेबलावर टेकून त्याच्या मुद्रेकडे शोधक दृष्टीनें पहात वृन्दा म्हणाली, "जगदीश, मला वाटतं आतां मी हें काम सोडून द्यावं." "कां? कां?" निराशेच्या स्वरांत जगदीशनें प्रश्न केला. "लग्न करावं असं वाटतंय." आश्चर्यातिशयानें जगदीशचे डोळे विस्फारित झाले! "वृन्दा, ही तूंच का? त्या दिवशीच्या तुझ्या तेजस्वी व्याख्यानंतली तडफदार विचारसरणी तुझीच ना? आपल्या हातांनीं आपलं स्वातंत्र्य गमावायला तूं तयार आहेस?" "होय जगदीश."

" वृन्दा, स्वातंत्र्य घालवण्याच्या दुबळ्या विचारसरणीचा जर तूं अंगीकार केलास तर माझ्या कार्यानें कुणाच्या तोंडाकडे पहावं ? तुझ्यासारख्या बुद्धिमान् ' तडफदार ' कळकळीच्या पुढाऱ्याची स्त्रीस्वातंत्र्याच्या कार्याला गरज आहे असं तुला नाहीं वाटत ? प्रसंग पडल्यास वैयक्तिक सुखाचा बळी देऊन मनुष्यानं हें कार्य केलें पाहिजे. मग वृन्दा, पारतंत्र्याचा अंगीकार करण्या-च्या खोट्या भावनामय सुखाचा त्याग करतांना तुझ्यासारख्या बुद्धिमान मुलीला आनंदच वाटला पाहिजे "

जगदीशचे साधेच शब्द, पण ते आपल्या अंतःकरणावर कसलें तरी जड ओझें ठेवताहेत असा वृन्देला भास झाला ! परमेश्वरानें आपल्याला दुःख म्हणजे काय चीज असते तें कळूं दिलें नाहीं. तें शेवटीं आपल्या प्रियकराकडून लग्नावांचून रहाण्याचा उपदेश ऐकण्याच्या सुधारलेल्या दुःखाचा कडू काढा पाजण्याकरतां कीं काय ? वृंदेच्या डोक्यांत विचार आला

पण आज तिच्या अंगांत कसल्यातरी निश्चयाचा संचार झाला होता. मनाशींच ती म्हणाली, " जगदीश, तुझ्यासारखा मोहरा मिळवण्याकरतां आणि माझ्या भावनांचं ब्रीद राखण्या-करतां, स्त्रीजातीनं आजवर भूषण म्हणून वागवलेल्या कात्मघातक विनयाचं मोल द्यावं लागणारसं वाटतं."

वृन्देनें जगदीशच्या तेजस्वी मुखमंडलाकडे आपली निर्भय दृष्टि लावली. " नाहीं जगदीश, लग्नावांचून मला राहतां येणार नाहीं; अन् लग्न करून तुझ्या कार्याला मदत करणं, माझ्याकडून करून घेणं, तुझ्या हातांत आहे." तिच्या स्वरांत कंप येत होता. " जगदीश, तूं कधींच लग्न करणार नाहींस का ?" एका लहानशा वाक्यानं आपण आपलं सुखदुःख इरेला घालतों आहों हें वृन्देला कळत होतें.

जगदीशनें तिच्याकडे पाहिलें. आयुष्यांत पहिल्यांदांच त्याच्या दृष्टींत कोमल मार्दव पाहिल्याचा तिला भास झाला! मानेला एक हिसका देऊन, घट्ट ओठ आवळून, उघड्या खिडकींतून त्यानें अनंत आकाशाकडे नजर फेकली व निश्चयी स्वरांत तो म्हणाला, "वृन्दा, हिंदुस्थानला ध्येयनिष्ठ कार्यकर्त्यांचा तोटा आहे, लग्नाला अधीर झालेल्या उल्लू प्रेमिकांचा नाहीं. स्त्रियांना त्यांचं स्वातंत्र्य प्राप्त करून देण्याचं मी कंकण बांधलं; आधीं केलं मग सांगितलें ह्या तत्त्वाचा मी पुरस्कार करतों. —मी स्वतः लग्न करून एका स्त्रीचं स्वातंत्र्य हिरावून घेतलें तर मी माझ्या कार्याशीं बेइमानी केली असं होणार नाहीं का? स्वातंत्र्यप्रेमी स्त्रिया माझ्यावर भरंवसा तरी ठेवतील का? नाहीं. वृन्दा, माझ्या ध्येयाला लग्न ही घटनाच विरोधी होते. मला लग्न करतां येत नाहीं—मी करणार नाहीं."

  

संस्थेच्या ऑफिसमधून वृन्दा परस्परच फिरायला गेली. तिच्या डोक्यांत विचारांची गर्दी उसळली. "अविवाहित राहून मी स्त्रीस्वातंत्र्याच्या कार्याला मदत केली तर जगाला तें उदात्त कार्य दिसेल, पण जगदीशच्या प्रेमानें मला त्या कार्यावर प्रेम करायला शिकवलें ही गोष्ट मला कळली आहे.—त्याच्याबरोबर तें कार्य मी अविवाहित राहून केले तर जगदीशच्या सहवासासाठीं तळमळणाऱ्या माझ्या अतृप्त आकांक्षांचें कोड पुरवण्याकरितांच माझ्याकडून त्या क्रिया होतील हें मला कळत आहे. जगदीश, तुला तें कळलं तर तुला काय वाटेल?"

संध्याकाळीं सूर्यास्ताच्या वेळेला वृन्दा इतक्या मंद पावलांनीं घरीं आली कीं, तिच्या येण्याचा कुणाला पत्ताहि लागला नाहीं. आपल्या खोलींत जाऊन, हातांतल्या एकदोन वह्या तिनें पलंगावर

टाकल्या, व उघड्या खिडकींतून मावळत्या सूर्याकडे निश्चल दृष्टीनें पहात, विषादपूर्ण जड स्वरांत ती स्वत:शींच म्हणाली, " The low Sun makes the colour. जगदीश, जरा कमी ध्येयवादी असतास तर जास्त बरं झालं असतं ! ज्या स्त्रीच्या स्वातंत्र्यासाठीं तळमळतोस, सुखावर पाणी सोडतोस, तिच्या मनोरचनेचा अधिक अभ्यास केला असतास तर असे एकांगी प्रयत्न केले नसतेस. देवाब्राह्मणाच्या साक्षीनं एका मुलीशीं लग्न करायचं तर तुझ्या नाजुक ध्येयवादाला धक्का बसतो. मग तुझ्या कार्याला मदत करून स्वत:शीं लपंडाव खेळतांना माझ्या प्रेमी मनाची व नीति-अनीतीच्या कल्पनांची किती ओढाताण होईल हें तुला कळतं का ? संस्कारामुळें, उच्च शिक्षणामुळें वाढवलेल्या ध्येयवादाची, माझ्या बुद्धिमत्तेची, माझ्यावरच्या सामाजिक जबाबदारीची किंमत तुला कळते, तसं मनुष्यावरच्या मानवी आकांक्षांचं, सामान्य विचार-विकारांचं प्रभुत्व कळलं असतं तर तूं मला अविवाहित राहून कार्य करण्याची विनंति केली नसतीस. जगदीश, दुसऱ्याच्या विस्तीर्ण बागेंतलं कलम आणतोस अन् घरच्या टीचभर कुंडींत, आंतली मातीसुद्धां न बदलतां, त्या कलमानं फोफावावं अशी आकांक्षा बाळगतोस ! असलीं कलमं मोकळ्या जमिनींत वाढतात; वर्तुलाकार, काळ्या, कच्च्या भिंतीनं चोहोंबाजूंनीं अडवलेल्या कुंडींतल्या मातींत वाढत नाहींत ! वाढत्या मुळांच्या पसाऱ्यानें कुंडी तरी फुटेल, नाहीं तर आंतलं कलम तरी नठेल ! आज, पुष्पसंभारानं नटलेलं हें कलम पहातांना धन्य वाटेल, पण उद्यां त्याच्या फोफावणाऱ्या मुळानं कुंडीचं बंधन फोडून खालच्या जमिनीचा आधार घेतला तर तें दृश्य पहायला तुझी तयारी हवी – आणि तरच तुझे प्रयत्न न्याय्य ठरतील ! विरोधी संस्कारांच्या ह्या गुणधर्मांचा विचार केला असतास तर, जगदीश,

आज तुझ्या कार्याला तुझ्या एकट्याऐवजीं तुझीमाझी मिळून दुप्पट मदत झाली असती ! "

~ ~ ~

सूर्य अस्ताला जाऊन बाहेर उदास अंधार पडला म्हणून वृन्देनें आंत दृष्टि फेंकली. आंतही अंधार पसरला होता ! उजेड करण्याकरितां मंद पावलानें दिव्यापर्यंत जाऊन तिनं दिव्याच्या स्वीचवर बोट ठेवलं, पुन्हां कांहींशा उदासपणें " नको बाई " असें म्हणून दिवा न लावतांच काढून घेतलें !

अंधार वाढतच होता व त्या नैराश्यपूर्ण उदास वातावरणांत कितीतरी वेळ वृन्दा एकटीच तळमळत होती !

# ‘ आई ’ !

१९२२ ची अखेर.

दिवाणखाना माणसांनीं नुसता फुलला होता. काव्यगायनाची नवीनच पडत चाललेली प्रथा, नाविन्यप्रिय रसिकजनांचा उत्सुक समुदाय व कवि यशवंतांची भावपूर्ण गानमोहिनी, असा त्रिवेणी-संगम झाल्यावर श्रोतृसमुदाय भावनांच्या लाटांवर नुसता हेलावत राहिला तर नवल काय ?

‘ शारदावंदन ’ झालें, ‘ देहाचा पूल ’ संपला; यशवंतांच्या भरदार कंठांतून निघालेल्या—

“ ‘हें नशिब आमुचें–’ म्हणुनी, वीरांच्या वदति न वाचा,
ते स्वतांच्याच रुधिरानें लिहिति लेख निज नशिबाचा ”

अशा ओजस्वी ओळी ऐकून, आणि देहाचा पूल करणाऱ्या मावळ्यांचीं वर्णनें ऐकून, श्रोतृवर्गावर थोडीफार गांभीर्याची छटा आली.

दोनचार मिनिटें गेलीं. पूर्वीच्या खड्या सुराऐवजीं बोबडा लाडिकपणाचा सूर निघाला: ‘ मालु नको ग । मी केलं कायतली ग ॥ ’ सभागृहांतल्या वातावरणांत त्या लाडिक भावनेची छाया पाहतां पाहतां पसरली; सगळ्यांच्या वृत्तींत बाल्याचा खेळकरपणा प्रकट

होऊं लागला. आणि काव्याच्या शेवटाला दिलेल्या गोड कलाटणीनें तर सगळयांच्याच वृत्ती कसल्यातरी आनंददायी आश्चर्याचा अनुभव घेतल्याप्रमाणें प्रमुदित झाल्या !

पण काव्यगायनाचा कार्यक्रम म्हणजे विविध भावनांचा थोड्या वेळांत अनुभव देण्याचें कवीचें आव्हान ! वीररस झाला, वात्सल्य झालें, आतां श्रोत्यांची लहर करुणरसाकडे वळली !

'आई', 'आई,' सगळीकडून एकच ध्वनि ऐकूं आला.

"'आई' म्हणोनि कोणी आईस हाक मारी"

एकदम शांतता पसरली !

काव्याचा संथ ओघ चालू झाला !

"ही न्यूनता सुखाची चित्ता सदा विदारी
स्वामी तिन्हीं जगांचा आईविना भिकारी.
चारा मुखीं पिलांच्या चिमणी हळूच देई
गोठ्यांत वासरांना ह्या चाटतात गाई
वात्सल्य हें पशूंचें मी रोज रोज पाहीं
पाहून अन्तरात्मा व्याकूळ मात्र होई
वात्सल्य माउलीचें आम्हां जगांत नाहीं
दुर्भाग्य याविना का आम्हांस नाहिं आई.'

—गाण्याच्या ऐन भरांत अगदीं दबलेल्या कंठांतून निघालेला अस्फुट हुंदका श्रोतृवर्गाला ऐकूं आला !

गाण्याचा ओघ चालूच होता. आणखी दोनचार ओळी झाल्या. उच्चासनाच्या अगदीं जवळ पुढल्याच ओळींत पालथ्या मांड्या घालून १७।१८ वर्षांच्या मुलींचा एक घोळका बसला होता. त्यांच्याकडे प्रेक्षकांच्या माना वळतात न वळतात तोंच आपले हुंदके अनावर होताहेत असें कळून आल्यामुळें पद्मावतीनें त्या घोळक्यांतून हळूंच उठून हॉलच्या लगतच असलेल्या मोकळ्या

व्हरांड्याचा रस्ता धरला !

सर्वांनीं एकदम उठलेले वाईट दिसेल ह्या एकाच कल्पनेनें, तिच्याजवळ बसलेल्या तिच्या मैत्रिणींनीं 'आई' कविता संपेपर्यंत कसातरी धीर धरला, पण त्यांचें सारें लक्ष त्या हॉलमध्यें भरून ओसंडणाऱ्या अभिनव काव्यगंगेपेक्षां बाहेर व्हरांड्यांत पद्मावतीच्या डोळ्यांतून ओघळणाऱ्या जिवंत भावगंगेकडेच जास्त लागलें होतें. 'आई'चे शेवटचे सूर हवेंत विलीन व्हावयाच्या आंतच आणखी दोघींनीं सोप्याचा रस्ता धरला.

सोप्यांतल्या एका मोठ्या दगडी खांबाला टेंकून दिवाणखान्यांत दबलेल्या अश्रूंना पद्मावती मोकळया मनानें वाट करून देत होती. तिचे फुलून फुलून दिलेले हुंदके तिच्या मैत्रिणींना तिच्यापासून चारपांच पावलांवर येतांच ऐकूं आले. जणूं काय मूर्तिमंत दुःखाचें तें हृदयद्रावक स्वरूप पाहिल्याबरोबर दोघीही क्षणमात्र गोंधळल्या ! मनःक्षोभाच्या त्या प्रचंड लाटेला कोणत्या रीतीनें थोपवून धरावें तें न उमजल्यामुळें थबकल्या ! एकदोनच क्षण—एकीनें पुढें येऊन हळूंच पद्माच्या गळयांत हात घातला आणि अगदीं हळूवार स्वरांत ती म्हणाली, " असें काय बरं पद्मा ?" पुढें काय म्हणावें हें तिचें तिलाच उमजेना !

दुसरीला तोंपर्यंत धीर आला. किंचित् पुढें होऊन ती म्हणाली, " नाहींतर आपण असें करूं या न शांते, आपण आतां इकडून टेकडीकडे फिरायला जाऊं या.–पुरें झालें काव्यगायन ! " आपल्या मैत्रिणीच्या दुःखाला कारण झालेल्या काव्यगायनाचा जणूं काय तिला राग आला होता !

पद्मावतीनें डोळे पुसले. मन आंवरण्याचा प्रयत्न करीत ती म्हणाली, " बरं चला. "

आणि तिघीही टेकडीकडे फिरायला गेल्या. उरलेल्या वेळांत

पद्मावतीनें दुःख आवरून ते विसरल्याचें नाटक केलें खरें, पण संध्याकाळीं घरीं आल्यावर पाठीवरचीं चार मातृविहीन भावंडें पाहतांच पुन्हां तिला आठवण आली—

" स्वामी तिन्ही जगांचा, आईविना भिकारी. "–आणि लहानशा धर्गानें कड यावा इतकें पद्मावतीचें दुःख ताजें होतेंही ! अवघ्या दोन महिन्यांपूर्वींच, तिच्या चार लहान भावंडांना व रिट्रेन्चमेंटच्या तडाख्यांत अकालींच पेन्शनांत काढल्यामुळें अकालींच वृद्ध झालेल्या तिच्या वडिलांना दुःखाच्या आणि दारिद्र्याच्या खाईंत होरपळत ठेवून तिच्या प्रेमळ आईनें जगाचा निरोप घेतला होता.

बिचारी पद्मा !

रात्रीचे दहा वाजले. लहान भावंडांना झोंप लागली. तिचे बाबा बिचारे तुकारामाचे अभंग म्हणून आपल्या दुःखाचा विसर पाडण्याचा प्रयत्न करीत ओसरींत फेऱ्या घालीत होते. संध्याकाळीं ऐकलेल्या ' आई 'चे सूर पद्मावतीच्या कानांत पुन्हां घुमूं लागले —

' शाळेंतुनी घराला येतां धरील पोटीं '—

" पद्मा, अजून वाचते आहेस का बाळ ? "

तिच्या वडिलांनीं विचारलें. हातांत पुस्तक घेऊन पद्मावती त्यावर अश्रु ढाळीत होती—

अखेर ती अंथरुणावर पडली. तिच्या डोळ्यांपुढें जिवंत चित्रें फिरत होतीं. वळचणीला छोटें घरटें, त्यांत चिमणीचीं कोंवळीं पिल्लें–चिमणी त्यांना चोंचींतून दाणे घालते आहे; अन् गोठ्यांत बागडणारें वासरूं–गाय त्याला चाटते आहे.

तिच्या शेजारीं कोंवळीं शावकें निजलीं होतीं, पण त्यांना चारा घालणारी चिमणी उडून गेली होती !

" आई ग ! " अगदीं विकल स्वरांत पद्मा म्हणाली.

आंसवांनीं भरलेल्या डोळयांनींच तिनें आपल्या भावंडांकडे पाहिलें, विश्रब्धपणें झोंपीं गेलेल्या सर्वांत लहान बहिणीच्या कपाळावरून हळुवार हात फिरवून तिला कुरवाळलें, ' वेड्या ' म्हणून झोंपेंतच तिचा पापा घेतला !

उभी संध्याकाळ रडून थकल्यामुळें थोड्याच वेळांत तिला झोंप लागली. पण तिला स्वप्नांत सुद्धां ती गाय आणि ती चिमणी दिसत होती.

  

तेरा वर्षांच्या दीर्घ कालावधींत दृश्य जगांत अनंत घडा· मोडी आणि उलटापालटी झाल्या, पण भावनावश मनावर काव्य-गायनाची पकड मात्र तशीच राहिली ! शाळेपासून कॉलेजच्या सुखी आयुष्याचे मनोरे उभविणाऱ्या पद्माला आईपाठोपाठच झालेल्या वडिलांच्या मृत्यूमुळें मॅट्रिक होण्यापूर्वींच स्कॉलर्शिपच्या साह्याय्यानें नर्सिंगचा कोर्स पुरा करावा लागला. तिची अगदीं लहान बहीणही आतां मॅट्रिकेच्या परीक्षेला बसण्याच्या तयारींत होती आणि कुटुंबाचा सर्वस्वीं भार भावंडांकरितां अविवाहित राहिलेली व मृत्युशय्येवरील वडिलांच्या वचनांत गुंतलेली पद्मा आपल्या मिळकतींतून वाहत होती

  

तसाच एक दिवाणखाना, तेच कवि, व तीच कविता. संध्याकाळची सुटी असल्यामुळें कांहींतरी करमणूक म्हणून पद्माला तिच्या हॉस्पिटलमधल्या एकदोघी मैत्रिणींनीं काव्यगायनाला ओढून नेलें, पण आतां त्या बालिशपणानें मांडी घालून पुढच्या रांगेंत बसल्या नव्हत्या. पावित्र्यापेक्षां सुद्धां एकप्रकारचें निवृत्तीचें दर्शक असें एक बिनकांठाचें पांढरें पातळ नेसून पद्मावती जवळजवळ मधल्या एका रांगेंत खुर्चीवर बसली होती

–पद्मावती ही व्यक्ति नव्हे, तरुण अंतःकरणाच्या चेंचल्या गेलेल्या महत्त्वाकांक्षा आणि कोंडल्या गेलेल्या भावना यांचें मूर्तिमंत प्रतीक!

काव्यगायनाला सुरुवात झाली. देहाचा पूल मागें पडला. कवीनें गुलामांचें गाऱ्हाणें गाइलें, अथांग जलांजलि वाहविली, वोगद्यांत सांपडलेल्या गाडीचें प्रतीकात्मक वर्णन केलें. देहाचा पूल जरी तेरा वर्षांत मागें पडला तरी विश्वव्यापी मातृप्रेमाचें वर्णन करणाऱ्या 'आई' ची मोहिनी मात्र जनमनावर तशीच राहिली.

'आई,' 'आई' श्रोतृवर्गांतून ध्वनि निघाला.

" स्वामी तिन्ही जगांचा आईविना भिकारी "

तेच करुण स्वर पुन्हां वातावरणांत घुमूं लागले. पण पद्मावती जणूं काय निर्विकार मनानें सगळें काव्यगायन ऐकत होती—

जगांत ध्येयवाद साधण्याकरितां कर्तव्याच्या कठोर वेदीवर उभे राहून जिवंत, कोमल भावनांचा बळी द्यावा लागतो, हंसत-मुखानें द्यावा लागतो. पद्मावतीनें तेंच केलें होतें, करीत होती!

गाणें सुरूंच होतें—

" चारा मुखीं पिलांच्या चिमणी हळूंच देई
गोठ्यांत वासरांना या चाटतात गाई "

त्याच ओळी, तीच पद्मा, पण आज तिच्या डोळयांत आईची आठवण येऊन अश्रू येत नव्हते–कांहीतरी हरवलें आहे अशा भावनेनें हुरहूर लागावी, कशाचा तरी अभाव जाणवून अंतः-करणांत भावनांचा कल्लोळ उठावा असें तिला होत होतें—

स्वतःच्या हृदयानें चालविलेल्या मुक्या आक्रांतापुढें कवीनें नंतर काय कविता म्हटल्या त्या तिला ऐकूंच गेल्या नाहींत!

  

काव्यगायन संपल्यावर ती घरीं आली. 'आई' चे चरण तिच्या कानांत घुमत होते—

" चारा मुखीं पिलांच्या चिमणी हळूंच देई
गोठ्यांत वासरांना या चाटतात गाई "

—पण आज तिला पूर्वीप्रमाणें रडून रडून थकल्यामुळें झोंप लागली नाहीं; विचारविकारांच्या वणव्यांत सांपडून जणूं काय बाहेर पडायचा रस्ता शोधतां शोधतां दमछाक झाली. श्रांत होऊन ती बिछान्यावर पडली होती. तिला कवितेंतलीं जिवंत शब्दचित्रें आठवत होतीं—

" चारा मुखीं पिलांच्या चिमणी हळूंच देई
गोठ्यांत वासरांना या चाटतात गाई "

—पण आतां तिच्या डोळ्यांपुढें वासरांना चाटणारी गाय नव्हे, तर नुसती गोजिरवाणी बचडीं वासरें फिरत होतीं; पिलांना चारा घालणारी चिमणी नव्हे, तर चिमणींच्या चोंचींतून चारा खाणारीं कोंवळीं असहाय शावकें दिसत होतीं !

# पावित्र्यविडंबन !

त्या पाकिटावर आठ वर्षांनंतर नानांचं हस्ताक्षर पाहून मला किती आश्चर्य वाटलं ! अतिशय कुतूहलानें मी पत्र वाचायला सुरुवात केली.

"अनेक आशीर्वाद विशेष:—

आज पत्र लिहिण्याचें कारण कीं, गेलीं तीनचार वर्षे अविश्रांत खटपट केल्यानंतर चि. दुर्गाबाईच्या विवाहाचा योग जुळून आला आहे. वर श्री. त्रिंबकराव हे ग्रॅज्युएट असून...गांवचे मालगुजार आहेत. घराणें प्रतिष्ठित व अतिशय बाळबोध वळणाचें आहे. विवाहाचा मुहूर्त येत्या वैशाख शु० नवमीचा धरला असून कार्य सिद्धीस नेण्यास श्री कुलस्वामिनी समर्थ आहे. परंतु आपणास मुद्दाम पत्र लिहिण्याचें कारण कीं, वरपक्षाचें घराणें व रीतभात पहातां आपल्या नियोजित वधूच्या प्रत्यक्ष भावाच्या चारित्र्याबद्दल त्यांना काय वाटेल त्याची कल्पना येते ! आपल्या वागण्यानें आपल्या प्रत्यक्ष घराण्याच्या अब्रूची काय वाताहत झाली आहे तिजबद्दल अधिक बोलणें म्हणजे अधिक संताप व अपमान करून घेणें आहे. आणि म्हणून तत्संबंधीं अजिबात शब्दोच्चार न करण्याचें मी पूर्वीच ठरवलें आहे परंतु लग्नकार्याच्या

मंगलप्रसंगीं थोरामोठ्या व्याहीमंडळींच्या समोर दहाजणांत मानहानि न व्हावी असें मात्र वाटल्यावांचून रहात नाहीं ! आपल्यामुळें गरीब व निरपराध दुर्गाताईलाही प्रसंगीं कमीपणा येण्याचा संभव आहे. परंतु ती गोष्ट अजून लांब आहे. सध्यां लग्नाच्या मंगलप्रसंगीं मात्र आपण गांवांत असून न आल्यास वाईट दिसेल व आल्यास अधिक चर्चेचा संभव !

या सर्व दृष्टींनीं पहातां या चारआठ दिवस आपण मुंबईस वगैरे गेल्यास अधिक बरें. आपण कुटुंबापासून फटकून निघाला असला तरी त्याच्या उरल्यासुरल्या अब्रूला जपण्याची नैतिक जबाबदारी आपणावर आहे व ती आपण पार पाडाल अशी आशा बाळगणारा

आपला

रा. श्री. वर्तक "

प्रत्यक्ष वडिलांचं तें मुलाला पत्र होतं ! त्यांतील मजकूर वाचून मला आश्चर्य वाटलं नाहीं. जुन्या पेशाच्या आणि करड्या शिस्तीच्या नानांचा स्वभाव माहीत असणाऱ्या कुणालाच वाटलं नसतं. गेल्या आठ वर्षांत नानांनीं माझं मुखावलोकन केलं नव्हतं ! पण दुर्गा—मी स्वतःच्या अंगाखांद्यावर खेळवलेली, माझी लाडकी, एकुलती एक बहीण ! तिच्या आयुष्यांतल्या अत्यंत महत्त्वाच्या प्रसंगीं मुद्दाम दूर जाण्याची कल्पना माझ्या पापी मनाला सुद्धां क्षणभर लागली ! लग्नाच्या समारंभाचं पावित्र्य आणि वातावरणाचं मांगल्य माझ्या नुसत्या अस्तित्वानं सुद्धां दूषित होतं का ?

हातांत पत्र घेऊन मी खिन्न मनानं खिडकीशीं उभा राहिलों. आईबापांच्या वात्सल्याला, चौघा भावांच्या प्रेमाला व जगाच्या सहानुभूतीला अपात्र ठरलेल्या माझी मलाच करुणा आली ! त्यांची चूक नव्हती, मीच पापी होतों आणि माझं तें पाप

दुसऱ्या पाकिटाच्या रूपानं माझ्याकडे रोखून पहात होतं!

तेंही पाकीट मी फोडलं. पण आंत काय मजकूर होता तें मला कळलंच नाहीं.—शेवटच्या सहीवर माझे डोळे खिळले होते:

" आपली

नेत्रा "

नेत्रा!—माझ्या पापी आयुष्याची सहभागिनी, दैवयोगानं आठ वर्षांपासून माझ्या सहवासांत आलेली गोमांतकांतल्या एका गायिकेची मुलगी, माझी भाडोत्री शय्यासोबतीण! ज्याकरितां मी समाजांतून बहिष्कृत झालों होतों तें मूर्तिमंत पाप! क्षणमात्र नेत्रा माझ्या डोळ्यापुढें फिरली. एकच क्षण, पहातां पहातां त्या मूर्तीचं दुसऱ्या एका मूर्तींत पर्यवसान झालं असा मला भास झाला. नेत्राच्या पाणीदार सुंदर डोळ्यांच्या ठिकाणीं अथांग भावपूर्ण दृष्टि-—गोऱ्या, गोंडस, मांसल देहाच्या ठिकाणीं सांवळी, शेलाटी, किंचित् निस्तेज शरीरयष्टि—निर्मला प्रधान!

काळाचा ओघ जणूं काय एकदम थांबला, दहा वर्षांनीं मागें हटला.

  

एका थिएटरांत आमची अगदीं पहिली ओळख माझ्या एका मित्रानें करून दिली, " निर्मला प्रधान, माझी मामेबहीण. —रघुनाथ वर्तक. तुम्हां दोघांच्याही जवळ मी एकमेकांबद्दल पुष्कळ बोललों आहे, नाहीं ? "

आम्ही दोघांनीं एकमेकांकडे पाहिलं. अतिशय सुंदर चेहरा पाहिल्यामुळें भांबावल्याचा अनुभव मला आयुष्यांत आला होता, पण बोलके डोळे पाहून मी आज पहिल्यांदांच भांबावलों होतों! औपचारिक रीत्या, " यांच्यामुळें आपल्या ओळखीचा योग आला " असं कायसं मला म्हणायचं होतं; पण निर्मला प्रधानचे बोलके

डोळे आधीं बोलले, "तुम्हांला काय म्हणायचं आहे तें मला माहीत आहे." मी मनांत म्हणालों, "तुला जर कळतं आहे तर उगीच कशाला शब्द वेंचायचे?"

आम्ही जवळजवळच्याच खुर्च्यांवर बसलों. नाटिका पहायला मी एकटाच आलों होतों. त्यामुळं, माझी प्रासंगिक टीका ऐकायला, माझ्या हास्यांत आपल्या हास्याचा सूर मिसळायला, एक मित्र भेटल्याचा मला आनंद झाला होता. आम्हीं एकीकडे गप्पा करीत होतों; पण मला कळलं कीं, माझ्या हास्यांत, अगदीं मनापासून, किंचित् मुग्ध पण निःसंकोच रीतीनं, एक तिसराच सूर मिसळत होता. नाटिका पहातां पहातां माझ्या मनांत येणाऱ्या विचारांचं प्रतिबिंब मला एक खुर्ची टाकून पलीकडे बसलेल्या व्यक्तीच्या अथांग भावपूर्ण डोळ्यांत दिसत होतं.

त्यानंतर तीनच महिन्यांत "आपणच का ह्या दोघांची ओळख करून दिली?" असें आश्चर्य माझा मित्र प्रकट करूं लागला! आणि आपलं एकाकी अपूर्ण जीवन अकल्पितपणें पूर्णत्वाकडे जातं आहे असा मला भास होऊं लागला! दिवसाचा कितीतरी वेळ आम्ही एकमेकांच्या सहवासांत असूं. निर्मलेच्या सहवासानं चैतन्यमय झालेलं माझं जीवन पूर्वीच्या निष्प्रभ आयुष्याकडे पाहून त्याची कींव करीत होतं!

निर्मला आईबापांची एकुलती एक मुलगी. ते लोक फारसे श्रीमंत नव्हते, परंतु लाडाचा एक प्रकार म्हणूनच तिला कॉलेजचं शिक्षण मिळत होतं. आमच्या जीवनांत एका दृष्टीनें कितीतरी साम्य होतें. दोघंही सुशिक्षित. तिच्या जीवनांत, जीवनकलहाला पारखी असलेली, विद्यार्थीदशेंतली स्वाभाविक हिरवी हिरवळ, तर माझ्या जीवनांत तो प्रश्न सुटल्यामुळें निर्माण झालेली मनुष्य-निर्मित बागाईत. माझ्या आयुष्यांतला थोडाफार मानसिक स्वास्थ्याचा

लग्नाच्या विचारांच्या सुरुवातीचा काळ हाच अखेरीस क्रांतीचा काळ ठरला—लग्नाचे विचार आणि निर्मला दोघांनींही त्यांत बरोबरच प्रवेश केला !

रोज मी निर्मलेला भेटत असे. आमचं घराणं वस्तुतः बाळबोध वळणाचं, पण बाळबोध घराण्याच्या वळणाचं सुकाणूं पुरुषांच्या मर्जीनुसार फिरत असतं ! मी पुरुषमनुष्य, त्यांतून मिळवता; माझ्या हालचालीवर कसलाच निर्बंध नव्हता आणि तिचा कुणाला पत्ताही नव्हता ! निर्मलेचं घराणं मुलींना पुरुषाशीं मैत्री करूं देणाऱ्या पण लग्नाचं स्वातंत्र्य नाकारणाऱ्या अर्धवट नकली सुधारकांचं ! आमच्या भेटींना त्यांच्या घरीं कधींच अड-थळा आला नाहीं,—प्रेमाच्या कोवळ्या रोपट्याला तारुण्याच्या ऐन वसंतांत सहवासाचं भरपूर पाणी मिळालं—आम्ही एकमेकांचीं आराध्यदैवतं स्वतःला नकळत झालों !

जगाच्या ठरींव मार्गाची जाणीव नसलेले दोन खुळे प्रेमी ! —आपण एकमेकांना अनुरूप असलों, आपल्या आवडीनिवडींत साम्य असलं, तरी आपण भिन्न जातीचे आहोंत; आपले शिक्षणसंस्कार सारखे असले, तरी आपल्या प्रत्यक्ष (!) चारशें वर्षांपूर्वींच्या पूर्वजांनीं स्वराज्यांत वेगवेगळ्या प्रकारचीं कामं केलीं आहेत; एकमेकांच्या सहवासांत आनंदानं जन्म काढूं शकूं असा आत्म-विश्वास वाटण्याइतकं आपल्याला एकमेकांबद्दल आकर्षण असलं, तरी हजारो वर्षांपूर्वींच्या ज्या चौदा ऋषींपैकीं एकाचे श्रीयुत वर्तक हे वंशज आहेत, त्यांपैकीं दुसऱ्याच्या वंशाशीं निर्मला प्रधानचा संबंध पोंचत नाहीं;—इत्यादि कितीतरी गोष्टींचा आम्ही प्रेमाला सुरुवात (!) करतांना हिशोब केला नाहीं ! त्या लाटेंत वाहून गेल्यावर आम्हांला कळलं कीं, लग्नबंधनावांचून प्रेमाची परिणति होऊं शकत नाहीं, आणि त्याहीपेक्षां उशिरां कळलं कीं, आमच्या

सुखाची काळजी घेणारीं आमचीं अपत्यवत्सल मातापितरं आम्हांला त्या बंधनानं बांधूं इच्छित नाहींत!––माझीं सनातनी म्हणून आणि तिचीं अर्धवट सुधारक म्हणून!

आम्हां दोघांची अगदीं रानदशीर मार्गानें तातातूट करण्यांत आली! वडिलांनीं मी मेलों असं समजून आंघोळ करण्याचा पुरातन धाक मला घातला, निर्मलेच्या आईनं विहिरींत जीव देण्याची भाषा सुरू केली! आमच्या सुखाच्या कल्पनांचं त्यांना आकलनच होत नव्हतं! आईबापांचं प्रेम हा सुद्धां केव्हां केव्हां असह्य जुलूम असतो! मी मिळवता होतों, पुरुष होतों, वडिलांच्या धाकदपटशाला भीक न घालणारा होतों; पण जिच्यांत माझा जीव गुंतला होता ती बंधनांत होती!

आमच्या भेटी आठ दिवसांनीं होऊं लागल्या––आठाच्या पंधरा दिवसांवर आल्या, त्याही मनाच्या प्रक्षुब्ध अवस्थेंत आईबापांच्या इच्छेविरुद्ध! शेवटीं एक दिवस निर्मलेनं मला आपल्या निग्रही स्वरांत सांगितलं, "रघुनाथ, आतां आपली भेट केव्हां होईल कोण जाणे! उद्यां मी बेळगांवला काकांच्याकडे जाणार." तिच्या मनांत काय आहे तेंच मला कळेना! "म्हणजे काय निर्मला, हा आपला शेवटचा निरोप का?" मी म्हणालों. "हो, तर काय?" तिनें एकदम दुसरीकडे तोंड फिरवलं, "जें मिळायचं नाहीं ठरलं त्याचा मोह कशाला उगीच?"

दुसऱ्या दिवशीं ती गेली.

आपल्यांतला सगळा जीवनरस शोषला गेला आहे असं मला वाटलं! एकटेपणाच्या, निष्फळ प्रेमाच्या यातना विसरण्याकरतां केव्हां केव्हां मी खूप वेळ मित्रमंडळींच्या सहवासांत काढण्याचा प्रयत्न करीत असे, पण चार मित्रांच्या सहवासांत मला आपल्या एकटेपणाची––मानसिक एकटेपणाची––जाणीव जास्तच होई. सहा महिने

मी त्या यातनांशीं झगडलों आणि शेवटीं एका अशुभ दिवसानं त्यांची–माझी जन्माची मैत्री केली !

त्या दिवशीं तिच्या लग्नाची कुंकुमपत्रिका—श्रीगजाननाच्या कृपेचा निर्वाळा देणारी, आणि मंडपाच्या शोभेंत भर टाकण्याच्या माझ्या लायकीबद्दल माझी खातरजमा करणारी माझ्या प्रणयिनीच्या लग्नाची कुंकुमपत्रिका—माझ्या हातांत पडली !

बधिर वृत्तानं मी पत्रिकेच्या वर छापलेल्या दोन फोटोंकडे पाहिलं. पोलीसखात्यांतला एक लठ्ठ ऑफिसर जगाच्या दृष्टीनं तिच्या प्रेमाचा मालक ठरला, आणि त्या मनोभूमिकेंत प्रेमाचं बीज पेरणारा त्याचा खरा धनी मंडपाला शोभा आणणारा वार-गीर म्हणून बोलावला गेला ! चडफडून मी त्या फोटोंकडे आणि गजाननाच्या चित्राकडे पाहिलं !

त्या डाकेनं आलेलं दुसरं पत्र—प्रणयिनी निर्मलेचें मला आलेलें शेवटचं पत्र होतं !

" रघुनाथ,

तुला पत्र लिहायला कुठून सुरुवात करूं तेंच कळत नाहीं ! सोबतच्या पत्रिकेवरून तुला माझ्या—आणि तुझ्या सुद्धां—नशिबांत काय लिहिलें आहे त्याची कल्पना येईल ! ज्याच्याकरतां ब्रह्म-देवानं मला निर्माण केलं आहे असा खुळा भरंवसा वाटत होता, त्याला विसरून एका तिऱ्हाइताशीं लग्न करायला उभी राहिले तर तूं मला दोष देशील का ? एकदां वाटतं तुला भेटून सगळं सगळं सांगावं, पण तसं तरी कुठं शक्य आहे ? आणि तुझ्या भेटीनंतर मी केलेला निश्चय माझ्या हातून तरी पार पडेल कां नाहीं कोण जाणे !

हें वाचतांना तुला काय वाटेल मला कल्पना आहे. माझ्या दुबळेपणाचा राग येईल ! खरंच, मी दुबळी आहे, पण स्वार्थी

आणि बेइमान नाहीं—तुला माहीत आहे आहे कां नाहीं तें ! पण मी तरी काय करूं ? आईच्या आणि बाबांच्या दुःखाकडे पाहिलं कीं, आपल्या मनाप्रमाणें लग्न करायचा विचार स्वार्थी वाटतो ! त्यांना माझ्यावांचून कोण आहे ? त्यांच्या समजुती चुकीच्या आहेत सगळं खरं, पण आतां त्या अगदीं वज्रलेप झाल्या ! त्यांचं मन वळवण्याची मी किती किती खटपट केली ! किती प्रेमानं त्यांनीं माझं लहानपणापासून केलं—त्यांच्या ठिकाणीं दुसरे आईबाप असते तर मी यापूर्वी कधींच संसारांत पडले असते ! त्यांनीं म्हणून इतकं शिक्षण तरी दिलं—आतां त्यांच्या उतारवयांत मी आपल्या हातांनीं त्यांच्या समाधानाला, सुखाला आग लावूं का ?

मला माहीत आहे, तुला ही विचारसरणी आवडणार नाहीं. कोणत्याही कारणामुळें कां होईना, खऱ्या प्रेमाचा त्याग हा क्षम्यच नव्हे असं तुला वाटतं; मला सुद्धां वाटतं, पण कृतीनं तसं करवत नाहीं. ऋणच शिल्लक ठेवायचं तर आपल्या स्वतःचं ठेवावं, इतरांचं कशाला ? स्वतःचा विचार सोडून जर मला माझ्या आईबापांना सुखी करतां आलं तर तो त्याग परमेश्वराच्या वहींत कुठेंतरी नोंदला जाईलच कीं !

एवढंच मला सांगायचं होतं-आतां यापुढें आपण कधीं-मधीं एकमेकांना ‘ खुशाली ’ चीं पत्रं लिहिणार !

आज सोमवार—आतांपर्यंत मनानं तुझी होते, दोन दिवसांनीं परस्त्री होणार ! आईबाबांचाच विचार करीत असते तोंपर्यंत ठीक, पण मध्येंच बुधवार गोरज मुहूर्त आठवला म्हणजे कसं आग लागल्यासारखं वाटतं—आणि त्यांतून तुला काय वाटेल ह्याचा विचार आला म्हणजे तर—

जाऊं दे.—आपखुशीनें केलेला त्याग जगांत उच्चारावयाचा

नसतो. मी आनंदानं लग्नाला संमति दिली आहे अशीच सग-ळयांची समजूत आहे, पण अगदीं आंत आंत कोंडून ठेवलेलें हें सत्य तुझ्याजवळ नाहीं तर कुणाजवळ बोलूं ?

रघुनाथ, एकच विनंति करते—मी केलं तें आनंदानं केलं नाहीं, सुखाकरतां केलं नाहीं, असह्य वेदना सोसून केलं, एवढं तरी जन्मभर आठवशील ना ?

तुझी

निर्मला ''

त्या पत्राच्या रूपानं गुप्मानं माझा जणूं काय शेवटला निरोप घेतला ! पण आपल्या सुखाचा विचार करणाऱ्या मला पत्र वाचून क्षणमात्र माझीच लाज वाटली ! त्यागाचं तत्त्वज्ञान नसानसांत भिनलेली, कृतज्ञतेच्या भावनेनं आपल्या हातानं सुखा-वर निखारे ठेवायला तयार झालेली ती देवता कुठें आणि सुखाचं ताट हातचं ओढलं जातांच गणपतीच्या निर्जीव चित्रावर चडफडणारा नादान रघुनाथ कुठें !

~ ~ ~

त्यानंतर दीड वर्षानें निर्मला पुन्हां माहेरीं आली होती आपल्या लहानग्या बाळाला घेऊन. पण तिची पूर्वीची आनंदी खेळकर वृत्ति सर्वस्वीं लोपली होती. दैवाचं आव्हान निर्भयपणें स्वीकारणाराच्या वृत्तींत जी एकप्रकारची निर्जीव, उदासीन शांतता येते तशी तिच्या वृत्तींत आली होती, आणि शब्दाचं साधन आपल्या हातानं गुदमरून मारून टाकल्यामुळें कीं काय, व्यक्त होण्याकरतां धडपडणाऱ्या भावनांनीं तिच्या डोळयांत स्वतःला सामावून घेतलं होतं. मी केव्हां केव्हां तिच्याकडे जात असे. जगांत कोणतेही दोन मित्र वागतात तसेच आम्ही वागत असूं, विविध विषयांवर बोलत असूं; पण काय होई कोण जाणे, एकाच्या प्रत्येक विचा-राचा, भावनेचा प्रतिध्वनि दुसऱ्याच्या अंतःकरणांत उमटतो आहे

असं मला प्रतीत होई! दीड वर्षापूर्वी त्याच प्रतिध्वनीनं आम्हांला वेडं केलं होतं, आज तोच प्रतिध्वनि माझा जीव कासावीस करीत होता. पण निर्मला—तो ध्वनि जणूं काय तिला ऐकूंच येत नव्हता!

"तुझं बाळ कुठें आहे पाहूं ना?" ती आल्या दिवशीं मी म्हणालों. "त्याला काय पहायचं, रघुनाथ? बाकीचीं असतात तशीच हेंही एक आहे." मला कसं तरी वाटलं, पण शेवटीं मला तिनं तें अभिमानानं दाखवलं, त्याच्या लहानग्या जिवाच्या कौतुकाकरतां आपण काय काय विकत घेतलं त्याचंही वर्णन केलं!

पंधरा दिवसांतच तिच्या यजमानांचं तिला पाठवण्याबद्दल पत्र आलं. शांतपणानं ती जाण्याच्या तयारीला लागली. तिची आई तिला रहाण्याचा आग्रह करीत होती आणि ती "नको बाई, मला गेलं पाहिजे" अशी समजूत घालीत होती.

"कां, राणीसाहेबांच्यावांचून करमत नाहीं वाटतं महिनाभर सुद्धां?" मी विनोद केला! आनंदातिशयानं वृत्ती प्रफुल्लित झाल्या कीं मनुष्याला विनोद सुचतो, तसं दुःखाचं जहर अंगांत भिनलं म्हणजेही विनोद करावासा वाटतो कीं काय कोण जाणे! "मग काय तर!" माझ्याकडे पहात लज्जेचा सपशेल खोटा अभिनय करून ती म्हणाली. भावनांचं तें आंतल्या आंत गुदमरणं आणि मनोवृत्तींचा तो कठोर निग्रह! तें दृश्य मी कधीं विसरलोंच नाहीं.

पण त्या दृश्यानं एक परिणाम मात्र माझ्यावर केला—निर्मलेच्या तुलनेला सुद्धां आपण नालायक आहों असं माझं मला जाणवलं! ज्या अग्निकुंडांत तिनं उडी घेतली त्याच्या आसपास सुद्धां उभं रहायची माझी हिंमत नव्हती. तिनं लग्न केलं, आर्यपतिव्रताधर्माचं अक्षरशः पालन केलं. पाप हा शब्द तिच्या वाऱ्याला सुद्धां उभा राहूं शकत नव्हता—आणि मी?

प्रेमनिराशेनं भडकलेल्या माझ्या मनाला ‘ लग्न ’ ही कल्पनाच असह्य झाली. डोक्यावर अक्षता उधळून आणि गळ्यांत माळ घालून एखाद्या भाबड्या, निरागस तरुणीला मी धर्माच्या खोट्या शपथा घेऊन पत्नी म्हणून घरीं आणीन, पण तें माझं लग्न नव्हे. निग्रही निर्मलेनं ज्या कठोरतेनं देवापुढं मान वांकवली ती कठोरता, तो निग्रह माझ्यांत नाहीं, मग तो लग्नाचा फार्स तरी कशाला ? काळाच्या ओघांत आणि गाण्याच्या शोकांत नेत्रा माझ्या सहवासांत आली. दैवानं माझ्याबरोबर संगनमत केलं कीं काय कोण जाणे ! तिचं दैवत मी झालों आणि अखेर नेत्रा-एका पतितेची मुलगी-माझी सहचरी ठरली !

अब्रूदार घराण्याला कलंक लागला ! कुटुंबांतून मी वाळींत टाकला गेलों. गांवाबाहेर बंगला घेऊन मी एकटा रहात होतों आणि त्याहूनही एकट्या मनानं जगांत वावरत होतों. बाबांनीं म्हणे माझ्या नांवानं आंघोळ केली होती आणि आई माझं नांव कुणी उच्चारलं कीं अश्रू ढाळीत असे ! पण नेत्राचे पाश तोडावे, संभावित जगांत पुन्हां प्रवेश करावा, असा मोह मला कधीं वाटलाच नाहीं ! त्याला लोक निर्लज्जपणा म्हणत असतील—

—फक्त एका व्यक्तीची मला लाज वाटत होती, तिची भेट न व्हावी म्हणून मी गेलीं तीन वर्षें सतत खटपट केली होती ! निर्मलेच्या नवऱ्याची गांवोगांवीं बदली होत असे. त्यामुळें आणि पतिराजांची लाडकी (!) असल्यामुळें तिला माहेरीं यायला फारशी सवडच नसे आणि गेल्या तीन वर्षांत तर ती अजिबातच आली नव्हती. पण न जाणो पुन्हां केव्हां तिच्या-आपल्या भेटीचा प्रसंग आला तर ?—

आपल्या पापाची जर मला कधीं लाज वाटत असेल तर ती फक्त ह्या कल्पनेनं !

पण मी जगाकडे बेपर्वाईनं, तुच्छतेनं पाहिलं तरी जग माझ्याकडून तुच्छ मानून घ्यायला तयार नव्हतं. घरांतून मी वेगळा राहिलों, मला वाटलं आपला आणि वर्तकांचा संबंध सुटला; पण नात्याचे पाश नुसतं लांब राहून तुटत नाहीत. मी वर्तकांचा कुलकलंक होतों हें सत्य आज मला जाहीर करण्यांत आलं. एखाद्या महारोग्याप्रमाणें मला दूर ठेवावं म्हणजे अब्रूचा बचाव होईल असा निर्णय ठरला आणि त्याप्रमाणें आज मला मुंबईला जाण्याचा विनंतीवजा हुकूम झाला !

मी मुकाट्यानें कपडे बॅगेंत भरले, रजेची व्यवस्था केली आणि स्टेशनचा रस्ता धरला मुंबईस नेत्राकडे निघालों होतों मी.

  

दोनच दिवसांनीं वैशाख शु० नवमी. गोरज मुहूर्तांचीच वेळ होती. महालक्ष्मीच्या सडकावर बसून मी दुर्गेचा विचार करीत होतों. दुर्गा इतकी शहाणी गोड मुलगी होती !-तिला अनुरूप वर मिळाला असेल का ? ६॥ झाले. मनांतल्या मनांत मी तिला सुखाचा आशीर्वाद दिला माझ्या डोळ्यापुढें लग्नाच्या गडबडीनें गजबजलेलं आमचं घर—लहानपणापासून त्यांत पाहिलेले अनेक लग्नसमारंभ—अशीं कितीतरी दृश्यं फिरत होतीं आणि किंचित् विषण्ण मनानें तीं पहाण्यांत मी अगदीं रंगून गेलों होतों. इतक्यांत मागून मला तो चिरपरिचित आवाज ऐकूं आला—

" रघुनाथ ! "

' ओ ' देण्यापूर्वी मी वळून पाहिलं—ती निर्मला होती ! समोर पसरलेल्या अथांग सागरांत उडी घ्यावी असा विचार क्षणमात्र माझ्या मनांत चमकून गेला !

" हें काय निर्मला, तूं कुठें इकडे ?— "

" डॉक्टरला प्रकृति दाखवायला आले आहे इकडे."

" अन् एकटीच ? "

" हो, अशी अधेमधेच कुठली त्यांना रजा मिळायला ? "

" हो, पण तूं कसा मधेंच इकडे, रघुनाथ ? "

मी गोंधळलों, चांचरलों, लज्जेनें लाल झालों. अगदीं साधा प्रश्न—पण त्यानें जणूं काय माझ्या मर्मावर घाव घातला ! मी इथें कां त्याची त्या निष्पाप जीवाला कशी कल्पना येणार ?

" कां, येतो ना मी मधूनमधून मुंबईस ! " मी कांहींतरी बोलायचं म्हणून बोललों.

" हो, पण आज दुर्गाचं लग्न आहे ना ? आमच्याकडे आली होती कुंकुमपत्रिका ! " शेजारच्या एका खडकावर बसतां बसतां ती म्हणाली. आपली आई कुणा तिऱ्हाइताशीं बोलतांना पाहिल्यावर बोटानं धरलेला तिचा तीन वर्षांचा मुलगा तिला जास्तच बिलगला

" हो आहे ना ! अन् दुर्गाचं आज लग्न आहे म्हणूनच मी इथें आहे. "

तिनं प्रश्नार्थक मुद्रेनं माझ्याकडे पाहिलं. अगोदरच नाजूक झालेल्या जखमेला मिळूं नये त्या माणसाकडून धक्का मिळाला. माझ्या मानसिक यातनांचा कडेलोट झाल्यासारखं वाटलं. पण त्या यातनांनींच मला धैर्यही दिलं. तिचा पुढचा प्रश्न जाणूनच मी म्हणालों, " घरीं कुठलं मंगलकार्य असलं म्हणजे घरांतूनच काय जगांतून सुद्धां बाहेर जावं इतक्या योग्यतेला मी पोंचलों आहे. "

" म्हंजे काय, रघुनाथ ? " तिला थोडाफार विस्मय वाटला. खिशांतून काढून मी नानांचं पत्र मुकाट्यानं तिच्या हवालीं केलं. मला वाटलं तें वाचीत असतांना तिच्या चर्येवर तिरस्काराच्या भावना उमटतील, पण तसं कांहीं झालं नाहीं. पत्र संपवल्यावर त्याची तिनं गंभीरपणानं पुन्हां घडी केली, निरखून एकवार

माझ्या चेहऱ्याकडे पाहिलं—तिच्या दृष्टींत अनुकंपेऐवजीं थोडाफार अभिमानच होता !

किंचित् हंसून ती म्हणाली, " तुला काय वाटतं रघुनाथ, कीं तुझी सगळी हकीकत मला नव्यानं कळते आहे ? तुझी माझी भेट झाली नाहीं—तूं ती हेतुपूर्वक टाळलीस—तरी तुझी बातमी कळवून घेतल्यावांचून मी राहीन का ? कां तूं मला भेटायचं इतकं टाळलेंस, रघुनाथ ? "

' कां टाळलं ? ' " वेडे, " मी मनांत म्हणालों, " तुला खरंच कळणार नाहीं मी तुझ्यासमोर उभं रहायला सुद्धां कां धजलों नाहीं तें ! दुसऱ्यांचीं ऋणं देतां देतां आपल्या शरीरानं ऋण शिल्लक ठेवणाराला पापाच्या गर्तेत रुतलेल्याच्या—जाणीव असतांनाही रुतलेल्याच्या—मानसिक यातनांची कल्पना कशी येणार?" माझ्या उत्तराची क्षणमात्रच वाट पाहून ती म्हणाली, " माझ्यावर रागावलास होय, रघुनाथ ? "—आठ वर्षांपूर्वीचा परिचित प्रश्न ! तिच्या डोळ्यांत पाणी होतं, आवाजांत कंप होता—मला असह्य झालं ! त्यावेळीं त्या लाडिक प्रश्नाला अनेक वेळां दिलेलं उत्तर पुन्हां देऊं का ?

मी एकदम तोंड फिरवलं, माझ्या मोहवशतेची मलाच लाज वाटली. आवाजांत येऊं पहाणारा कंप, डोळ्यांत डोकावणारं पाणी क्षणांत परतवून तिनं तिच्या परिचित निग्रही स्वरांत हांक मारली, " रघुनाथ ! "

त्या कंपामागून आलेल्या त्या संबोधनाने कितीतरी भाव माझ्याजवळ प्रकट केले !

" तूं प्रत्यक्ष गांवांत येऊन गेलास आणि निरोप पाठवला तरी भेटायला आला नाहींस, होय ना ? "

मी किंचित् चिडून म्हणालों, " निर्मला, तुला माझी हकीकत

—माझा अधःपात माहीत आहे म्हणतेस आणि असं असून तूं मला हा प्रश्न विचारते आहेस का ?"

"बरं, असेल हकीकत !" समोरच्या दर्याकडे शून्य दृष्टीनें पहात त्याच बेफिकीर व निग्रही स्वरांत ती म्हणाली. "हकिकतीचा माझ्या घरीं येण्याशीं, मला भेटण्याशीं काय संबंध ?"

"काय संबंध ? तुला नसेल वाटत, पण तुझ्या घरांत पाऊल टाकायला मला किती शरम वाटेल त्याची तुला कल्पना येते का ?"

"शरम ! शरम काय म्हणून रघुनाथ ?" तिच्या स्वरांत, तिच्या प्रश्न विचारण्याच्या पद्धतींत, जगांतल्या कटु सत्याची ओळख पटल्यामुळं येणारा तिरस्कारमिश्रित कडवटपणा होता !

"शरम कां तें काय सांगूं निर्मला ?" आदरातिशयानं मी म्हणालों. "खरंच, कसं, कसं तूं दैवाचं आव्हान इतक्या निश्चयानं स्वीकारलंस आणि पत्करलेली भूमिका इतक्या शांतपणानं पार पाडते आहेस ?"

"कशी पार पाडते आहे ?–हंः" जणूं काय मनाशींच प्रश्न विचारून ती उपरोधिकपणानें हंसली–अजून तिची शून्य दृष्टि दर्याकडेच होती !

तरी माझं तिकडे लक्ष नव्हतं. आदर उचंबळून मी पुन्हां म्हणालों, "खरंच निर्मला, तुझ्या घराच्या पवित्र वातावरणांत माझ्यासारख्यानं पाऊल ठेवलं तर तें वातावरण कलंकित होईल, नाहीं ?"

"बस कर, रघुनाथ !" ती एकदम उसळली. आपल्या डोळ्यापुढून जाणारे चित्रपट पहाणें तिला जणूं काय अशक्य झालं.

"कां, बस कां ? तुझ्याबद्दल वाटणारा आदर सुद्धां बोलायची

चोरी आहे का निर्मला ? "

" —कारण त्या आदराला मी पात्र नाहीं. ज्याला मी मनोभावानं आपला मानला त्याच्यावांचून दुसऱ्या एका तिऱ्हाइताशीं –ज्याच्याबद्दल तो भाव माझ्या मनांत कधींच निर्माण झाला नाहीं अशा एकाशीं–मी लग्न केलं, त्याचा संसार मी इमानानं बिनतक्रार करते आहे, पुढेंही करीन–इतकंच त्यांतलं सत्य आहे ! कसलं मांगल्य अन् कसलं पावित्र्य ! "

" म्हणजे काय निर्मला ? कसं झालं तरी लग्नाच्या पवित्र बंधनानं तूं स्वतःला बांधून घेतलं आहेस–आणि मी ? जाऊं दे. "

" जाऊं दे.—आज आठ वर्षं कोंडून ठेवलेल्या सत्याचा उच्चार करावासा वाटतो आहे ! पण खरंच रघुनाथ, डोक्यावर अक्षता उधळल्या गेल्या आणि भटजींनीं मंत्र म्हटले म्हणजे नात्यामधें पावित्र्य निर्माण होतं अशी खरंच का रे तुझी कल्पना आहे ? "

" मंत्रानं नसेल, पण ज्या निष्ठेनें तूं आज संसार करते आहेस– "

" निष्ठा !–कुठली निष्ठा, रघुनाथ ? ही निष्ठा माझी नाहीं, माझ्यावर लादली आहे, संस्कारांनीं लादली आहे ! ज्या संस्कारांत मी वाढले त्या संस्कारांनीं सत्याच्या समोर छातीठोकपणानं उभं रहायला मला शिकवलंच नाहीं; डोळ्यावर कातडं ओढून स्वतःची फसवणूक करायला शिकवलं.—लग्नाच्या वेळीं मला वाटलं आपण त्यागाचं समाधान तरी मिळवूं.–कुठला त्याग ! प्रतिकाराचं सामर्थ्य नसलेल्या दुबळ्या जीवांनीं निर्माण केलेले शब्दांचे कोटकिल्ले ! पण त्यांत माझी तरी काय चूक ? लहानपणापासून सामान्य मानवतेला न झेंपणाऱ्या त्याग, निष्ठा, पावित्र्य, ऋणदान अशा किती शब्दांचं धडधडीत खोटं अवडंबर आमच्याभोंवतीं केलेलं असतं त्याच्यांतून सत्याचा प्रकाश आम्हांला दिसतच नाहीं ! तुलाच नव्हे, मला सुद्धां लग्नाच्या वेळेस

असंच वाटलं कीं, आतां आपण एका पवित्र ग्रंथीनं बांधले गेलों. —डायरेक्ट स्वर्गातून आणला होता ना तो परवाना!" तिची दृष्टि सागराकडेच होती. "पण आतां–आठ वर्षं विवाहित आयुष्यांत काढल्यावर–कळतं पावित्र्याचा आम्ही कसा होम करतों आहों तें!"

"तूं? अन् पावित्र्याचा होम करते आहेस?"

"हो, मी करते आहे." ती ठासून म्हणाली. "आणि विषमविवाहाला उभे राहिलेले सगळेच करतात,—जें पावित्र्य भावनेंत नसतं, खऱ्या नात्यांत नसतं, तें निर्माण करण्याकरतां खटपटीनं त्याच्यावर पावित्र्याचा शिक्का मारतात! तुला माहीत आहे, पांच पैशाचं गणपतीचं चित्र आणि एक आण्याचं वर्खाचं तोरण अशा नऊ पैशाच्या किंमतीनं आमच्या लग्नांत मांगल्याचा आणि पावित्र्याचा व्यवस्थित नकली आभास निर्माण करायचा असतो, आणि टोपीपगडी हे आमचे मंगल वातावरणाचे परवाने, ते वाळगणारांनींच फक्त मंडपाची शोभा वाढवायची असते, वधूवरांनीं डोक्याला मुंडावळी बांधून, डोळ्यांत काजळ घालून अक्षतांचा शिक्का कपाळावर मारायचा असतो, आणि ह्या सगळ्या निर्लज्ज नाटकाला पवित्र लग्नबंधन म्हणायचं असतं! ह्या नाटकांत नायकाचं काम करायचं तूं नाकारलंस ह्याची तुला शरम वाटते रघुनाथ?"

मी स्तिमित होऊन तिच्याकडे पहात होतों. लज्जेनें चूर झालेल्या मी आतांपर्यंत लग्नाकडे एकाच दृष्टीनं पाहिलं—'पवित्र ग्रंथि'. तिच्या प्रश्नाला मला उत्तर देतां आलं नाहीं.

"मनानं लावलेल्या लग्नाला भटांनीं परमेश्वराचा आशीर्वाद मिळवून द्यायचा असेल, माझं अक्षरशः लग्नच भटांनीं लावलं आहे! तुला वाटतं तूं पापी आहेस, अपवित्र आहेस. तुला तुझ्या मनाची लाजच वाटते, मला माझ्या शरीराची किळस येते आणि तरी मला पतिव्रताधर्माचं देणं द्यावं लागतं—विनतक्रार द्यावं लागतं."

तिच्या पदराशीं खेळणाऱ्या बाळाकडे भेदक दृष्टीनं पहात ती म्हणाली.

" स्–स्–किती भयंकर बोलते आहेस निर्मला ? "

" भयंकर ?–पण भयंकर आचरणारांना भयंकर बोलायची कसली भीति ? आमच्याबद्दल आदर बाळगतोस रघुनाथ ?--किती वेडा आहेस ! तुला वाटतं तूं पावित्र्याचं विडंबन करतो आहेस त्याचा अर्थ इतकाच कीं, तूं आपल्या अपवित्र नात्यावर पावित्र्याचा शिक्कामोर्तब करायचा प्रयत्न करीत नाहींस. पण ब्रह्मदेवानं करकचून बांधलेल्या रेशिमगांठीच्या आधारावर आम्ही जितकं पावित्र्याचं विडंबन करतों तितकं–तितकं–" तिचं अंग शहारल्यासारखं झालं. " तितकं-तुझ्या नेत्रानं तर सोड, पण--पण नेत्राच्या आईनं सुद्धां केलं नसेल ! "

# शिकारी !

बी. ए. ला फर्स्ट क्लास आल्यावर त्याला कॉलेजांत फेलोशिप मिळाली व एम्. ए. झाल्याबरोबर प्रोफेसरची जागाही मिळण्यासारखी होती, त्यामुळें सहाजिकच त्याच्या लग्नाची भाषा सुरूं झाली व त्यानें रीतसर मुली पहायला सुरुवात केली आणि काय दैव !—जिच्या सौंदर्याची, सुस्वभावाची ख्याती त्यानें ऐकली होती ती देशपांडे वकिलांची इंग्रजी सहावींतली मुलगी त्याला सांगून आली.

तो एका मित्राबरोबर तिला पहायला गेला वडिलांच्या पाठोपाठ दिवाणखान्यांत प्रवेश करून ती त्याच्या समोरच्याच खुर्चीवर खालीं मान घालून बसली.

शुद्ध, सात्त्विक, चित्रासारखं रेखीव सौंदर्य त्याच्यापुढें मूर्त स्वरूपांत उभं होतं. शुभ्र गोरेपण, भरीव पण एखाद्या संस्कृत नायिकेला शोभावी अशी वेलीसारखी दुबळी भासणारी शरीरयष्टि, सरळ नाक, काळेभोर शांत डोळे, पोवळ्यासारखे लाल ओठ आणि किंचित् पिंगट रंगाच्या केसांचा सैलसा अंबाडा. तिची साधी वेषभूषा तिच्या सौंदर्यांत अधिकच भर टाकीत होती.

त्यानें विचारलेल्या दोनचार प्रश्नांचीं तिनें हळूंच किंचित्

कांपणाऱ्या आवाजांत वर न पहातांच उत्तरं दिलीं. तो विवेकबुद्धीचा मनुष्य होता. त्याला वाटलं, आपण हिचं परीक्षण करायला आलों, हिला नसेल का आपल्याला पारखून घ्यावसं वाटत? कांहींतरी करून तिला बोलायला लावण्याकरतां, आपल्या मित्राकडे वळून पाहून, अर्धवट विनोदी स्वरांत तो म्हणाला, " आतां माझी उत्तरं देण्याची पाळी, नाहीं रे श्रीधर ? "

पण एकाही शब्दाचा उच्चार न करतां तिनें कृतज्ञतेनें, आदरानें, कांठोकांठ भरलेल्या डोळयांनीं त्याच्याकडे पाहिलं आणि पुन्हां खालीं मान घातली.—ती बोलली असती तर त्याला जास्त बरं वाटलं असतं. पण तिच्यामधें नाकारण्यासारखं कांहीं नव्हतंच. रूप, शिक्षण, सुदृढ प्रकृति, थोडाफार पैसा. लवकरच एका सकाळच्या मुहूर्तावर त्यांचं लग्न झालं. त्याच्या इच्छेप्रमाणें दोन्हीं वऱ्हाडं एका ठिकाणीं होतीं. दुपारपासून वडील मंडळींचा चौकीपहारा चुकवून तो तिला एकटीला गांठण्याकरतां टेहेळणी करीत होता. त्याला वाटलं, प्रेमाचे मार्ग प्रेमाला कळतात. वऱ्हाडाच्या गर्दींत तिला शोधायचं कसं हें ज्यानं आपल्याला शिकवलं तोच आपल्याला एकटं सांपडायचं कसं हें तिला शिकवील. पण त्याची आशा फलद्रूप होण्याचं चिन्ह दिसेना ! अखेर, अशा परिस्थितींतल्या तरुण जीवांचे मोठे आधार जीं छोटीं बाळं त्यांपैकीं एकाचा त्यानें आश्रय केला आणि वरच्या गॅलरीच्या अगदीं टोंकाचा पत्ता देऊन तिच्याकडे निरोप पाठवला.

ती आली, शांतपणानं त्याच्यासमोर उभी राहिली. आनंदाचा तजेला चढलेलं तिचं सौंदर्य पाहून तो क्षणमात्र मुग्ध झाला, पण त्यानं अपेक्षिलेला भावनेचा रक्तिमा तिच्या चर्येवर नव्हता.

" आज संध्याकाळीं नांव ठेवायचं आहे माहीत आहे ना ? "

“ हो ” ती म्हणाली.

“ काय नांव आवडतं ? ”

“ कांहीं चालेल. ”

“ कांहीं चालेल ? ” त्याच्या खेळकर वृत्ती जाग्या झाल्या. “ म्हाळसा–चंडिका–कांहीं ? ”

त्याला वाटलं ती ‘ कृतककोपा ’नें आपल्याकडे पाहील —मानेला झटका देऊन आपला निषेध व्यक्त करील. पण त्यांतलं कांहीं झालं नाहीं. तिची नजर अधिकच खालीं गेली, डोळयांत अश्रू जमा झाले.—तो चकितच झाला !

“ राग आला का मी नांव सांगितलं नाहीं त्याचा ? ” ती केविलवाण्या स्वरांत म्हणाली.

“ छे, राग कसला ? मजेनं म्हटलं. ”

त्याला वाटलं आपल्या हातानं तिचे डोळे पुसावे, पण ‘ आव जाव घर तुमारा ’ तत्त्वाचं प्रत्यक्ष दालनाप्रत परिपालन करणारं तें लग्नघर होतं.

त्यानं आपल्या आवडीनं तिचं नांव ‘ सुमित्रा ’ ठेवलं.

  

प्रौढ यौवन सागराला अर्पण केलं, त्याच्या जीवनाशीं समरस झालं, तरी नदी कांहीं आपलं नांव टाकीत नाहीं, आपलं अस्तित्व नाहींसं करीत नाहीं. पण दिवाकराच्या अस्तित्वांत सुमित्रा मात्र सर्वस्वीं विलीन झाली होती. तिच्या आवडीनिवडी, इच्छा, आकांक्षा सगळं सगळं दिवाकरमय झालं होतं. त्याचं सुख तेंच तिचं, त्याची इच्छा तीच तिची !

घरांत तर नव्या सूनबाई म्हणजे सर्वांच्या जीव कीं प्राण होत्या. सुंदर, सात्त्विक, विनयशील, आज्ञाधारक, कष्टाळू, सोशिक, समाधानी वृत्तीच्या आणि गरीब हाडाच्या अशा त्या कुलवधूनं

त्यांच्या घराण्याच्या शोभेला आणि आनंदाला द्विगुणित केलं होतं. सगळीं म्हणत, 'दिवाकर फार भाग्याचा म्हणून त्याला असलं स्त्रीरत्न प्राप्त झालं'.

त्यानं पुण्यास बिऱ्हाड केलं. दीड वर्षानं तो एम्. ए. ला बसणार होता. त्याच्या अभ्यासाला अडथळा येऊं नये म्हणून ती परोपरीनं त्याची काळजी घेत असे, त्याच्या सुखाला जिवापाड जपत असे.

एक दिवस तो म्हणाला, "आपण असं करूं या–बादशाही बोर्डिंगमधला डबा आणून जेवत जाऊं. तूं जा हुजूरपागेंत, दोघंही बरोबरच परीक्षेला बसूं.-संसार जन्मभर करायचाच आहे, आजच कशाला तूं शिक्षण सोडतेस ?" अभ्यासांत ती हुषार होती.

"होय ?" तिनं त्याला पहिल्यांदांच विरोध केला. "पण नको बाई खाणावळीचं अन्न. मॅट्रिकची परीक्षा कांहीं अधिक नाही, पण एम्. ए. ची परीक्षा म्हणजे किती दगदग !"

"पण लग्नापूर्वी तर तुला मॅट्रिक व्हायची हौस होती ना ?"

"होती, पण आतां आपल्या सुखापेक्षां कांहीं परीक्षा जास्त नाहीं."

"सगळया एम्. ए. च्या विद्यार्थ्यांना तुझ्यासारख्या आर्य-पतिव्रता बायका असतात वाटतं सुखाकडे पहायला ?" तो किंचित् कडवट स्वरांत म्हणाला.

तिनं लगेच माघार घेतली. "त्याच्या पुढच्या वर्षी बसेन परीक्षेला." त्यानं मुकाट्यानं संमति दिली.

त्या रात्रीं तिनं आपल्या एका मैत्रिणीला पत्र लिहिलं. तिनं काय लिहिलं असावं हें जाणण्याचं त्याला कुतूहल वाटलं–पण एकानं दुसऱ्याला लिहिलेलं तें पत्र होतं. दुसऱ्याचीं पत्रं वाचायचा कुणालाच अधिकार नसतो.

तो तिला म्हणाला, “ तुम्ही एकमेकींना काय लिहितां ग एवढ्या लांबलचक पत्रांत ? ” तिनं मुकाट्यानं तें पत्र त्याच्या स्वाधीन केलं.–“ हें काय ? ” तो चकित होऊन म्हणाला. “ पहा ना ! ” पत्रांतील मजकूर जाणण्याच्या त्याच्या कल्पनेला तिनं जराही विरोध केला नाहीं !

तिनं लिहिलं होतं–“ जगांतलं अत्यंत मौल्यवान् रत्न देवानं मला दिलं यावद्दल मी त्याची किती कृतज्ञ राहूं कळत नाहीं ! खरंच प्रभा, त्यांच्या पायाच्या धुळीच्या कणाची सुद्धां मला सर नाही. ”

वाचन संपल्यावर रागीट स्वरांत तो म्हणाला, “ क्षमा कर सुमित्रा, पण हा काय खुळसटपणा आहे तुझ्या मजकुराचा ? असा काय मी स्वर्गातून उतरलों आहे कीं माझ्या पायाच्या धुळीची तुला किंमत वाटावी ? सोडून दे तूं ही आंधळी श्रद्धा ! तुझ्यांत काय कमी आहे ? तूं शिकणारी आहेस, सुजाण आहेस, परमेश्वरानं फार थोड्या लोकांना दिलेलं सौंदर्य तुला मिळालं आहे. ”

कृतज्ञतेनें तिचं अंतःकरण भरून आलं !

त्यानं तिच्या परवानगीनें त्या पत्राच्या चिंध्या केल्या. तिनं दुसरं पत्र लिहिलं.

  

त्याची परीक्षा झाली. “ कसंहि करून चार दिवस इथं ये, मी अगदीं रिकामा आहे ”–त्यानं आग्रहानं श्रीधरला लिहिलं.

स्टेशनवर उतरल्यावर, आपल्या येण्यानं दिवाकरला झालेला आनंद पाहून श्रीधरला स्वाभाविकच अभिमान वाटला. पण गमतीनं त्याच्या पाठीवर थाप मारून तो म्हणाला, “ वा गुरू ! कां उगीच आम्हां गरिबांची शोभा करतां तुमच्या राणीसाहेबांच्या

समोर ! अरे गृहस्था, मला वाटलं आतां तुझं प्रेमाचं माणूस गप्पा करायला आलं तेव्हां तुझ्याकडे वर्ष दोन वर्षे तरी पहा-यला नको तुझ्या मित्रमंडळींनीं ! "

न बोलतां दिवाकरानं हमालाच्या शोधाला सुरुवात केली ! "कां रे बुवा," श्रीधरनं पिच्छा पुरवला, "तुला दम भरलाय् वाटतं वहिनींनीं मला आमंत्रण केल्याबद्दल ? पण तेंही खरंच आहे ! परीक्षेंतून मोकळा झालास न झालास तोंच मला पत्र लिहिलंस, स्वाभाविकच आहे त्यांना राग येणं. "

"राग ! " निष्फळ हंसण्याचा प्रयत्न करीत दिवाकर म्हणाला, "अरे, माझं प्रेमाचं मनुष्य म्हणजे शुद्ध देवतास्वरूप आहे बघ ! रागलोभासारख्या क्षुद्र विचारांना थाराच देत नाहीं तं ! "

चारपांच दिवस त्यानं आनंदांत काढले.

श्रीधर गेल्यावर त्याला त्यानं पत्र लिहिलं, "इतकं एकटं एकटं वाटतं आहे तूं गेल्यापासून ! घरांत सारीं दोन माणसं. त्यांतलं एक आपलं अस्तित्व विसरलं, आपल्या व्यक्तित्वाला त्यानं दुसऱ्याच्या व्यक्तित्वांत विलीन करून घेतलं, कीं खऱ्या अर्थानं शेवटीं एकच मनुष्य उरतं. "

  

त्यानं प्रोफेसरच्या कामाला सुरुवात केली. त्याच सुमारास त्याच्या वडिलांची बदली पुण्यास झाली. तिनं त्याच्या इच्छे-प्रमाणें हुजूरपागेत नांव घातलं. पण मोठ्या कुटुंबांतली ती विनयशील कुलवधू-तिचा अभ्यासच नीट होत नसे आणि ती त्याची फारशी कदरही करीत नसे ! परिणाम व्हायचा तोच झाला. ती नापास झाली !

वर्षाच्या सुरुवातीला पुन्हां तो म्हणाला, "तूं बोर्डिंगमधें

रहातेस का एक वर्ष ? घरांत अभ्यास होत नाहीं तुझा-"

तिला कसंतरी वाटलं! बायकोला माहेरीं पाठवायला खळखळ करणाऱ्या कितीतरी जांवयांच्या प्रेमकथा तिनं ऐकल्या होत्या!

लग्न झाल्यापासून तिनें कधीं स्वतःही माहेरीं जाण्याची इच्छा दर्शविली नव्हती-केवळ त्याला सुख व्हावं म्हणून. आणि आतां सबंध वर्षभर त्याच्यापासून दूर रहायचं! त्याचा स्वभाव तर इतका निष्काळजी होता,-स्वतःचीं पुस्तकं, कपडे, कशाचाच त्याला हिशोब नसे. लग्न झाल्यापासून त्याचीं हीं सगळीं कामं तिनं मनोभावानं केलीं होतीं आणि आतां आपल्याला कुठेंही दूर पाठवायला त्यानं नाराज असावं ही तिची हौस!

पण तिला वाटलं त्याच्या इच्छेविरुद्ध कसं जायचं ? मुकाट्यानं ती बोर्डिंगमधें गेली!

तो नेमानं तिला भेटायला जात असे. कधीं फुलांची वेणी, कधीं सुंदर हातरुमाल, कधीं ब्लाऊजला कापड नेत असे. पण शनिवारीं ती घरीं रहायाला आली, कीं त्याच्यांतला फरक तिला जाणवे. कसलं तरी गूढ औदासीन्य त्याच्या वृत्तींना बेजार करीत होतं!

  

ती परीक्षा पास झाली, कृतार्थ झाल्यासारखं वाटलं तिला! त्याच्या आवडीप्रमाणं ती वागली होती. यापुढें त्याच्या इच्छेविरुद्ध जायचं नाहीं असा तिनं अगदीं निश्चय केला! त्याच्या वृत्तींत आतां पालट होईल असा तिला भरंवसा!

ती घरीं आली, पुन्हां त्यांचा समाधानी संसार सुरू झाला! तिनं आपली इच्छा अशी कुठें शिल्लकच ठेवली नाहीं, कधीं त्याला विरोध केला नाहीं कीं कधीं कपड्यांचा, दागिन्यांचा हव्यास बाळगला नाहीं. क्षुद्र मनाच्या द्योतक अशा त्या गोष्टींना

आपल्यापासून शक्य तों लांब ठेवण्याकरतां तिची खटपट !

  

एके दिवशीं तो कॉलेजमधून परत यायला निघाला तो विद्यार्थीविद्यार्थिनींचा एक घोळका गॅलरींत उभं राहून स्त्रियांच्या नोकरीच्या प्रश्नावर जोराजोरानें वाद करीत होता. "स्त्रियांनीं शिकून वाढत्या बेकारींत भर मात्र घातली आहे. पुरुषांनाच पुरेशा नोकऱ्या नाहींत, त्यांत आतां बायकांची गर्दी. स्त्रियांनीं ज्ञानसंपादन जरूर करावं पण नोकरी हें त्यांचं ध्येय नव्हे." जीवनकलहाच्या जवळ येऊन पोंचलेले सीनिअर बी. ए. च्या वर्गातले खानोलकर आवेशानें प्रतिपादीत होते !

हॅट घेऊन जिन्याचा रस्ता पकडायच्या बेतांत असलेल्या तरुण खेळकर वृत्तीच्या 'सरां'चा खानोलकरांनीं साहजिकच धांवा केला ! 'सर' वादाला न्यायाधीश उभे राहिले !

"बस् एवढंच का खानोलकर ?" उंच, धरधरीत नाकाची, भव्य कपाळाची आणि बुद्धिमान् डोळ्यांची अरुणा भाटे ठांसून म्हणाली. "पुढचं तें ठराविक छापाचं बोलणं बोला ना सगळं ! 'त्या कोमल लता आहेत आणि गृहराज्याची स्वामिनी होऊन नवऱ्याची मर्जी संभाळणं हेंच त्यांचं खरं कार्य !'–सगळं म्हणा ना !"

"मग काय कोमल लता नाहींत, रांकट शिपाईगडी आहेत असं म्हणायचं ?" सगळ्या पुरुषविद्यार्थ्यांनीं एकदमच गिल्ला केला !

"हो, जरूर म्हणावं !" तिच्यांतला तेजाचा कण जास्तच प्रज्वलित झाला ! "शब्दांना घाबरायचे दिवस आतां गेले ! लता म्हणा, देवता म्हणा, पण निर्जीव वस्तु म्हणून दुसऱ्यांच्या –केवळ तो पैसा मिळवतो आणि त्यावरून स्वतःची लायकी ठरवतो म्हणून–दुसऱ्याच्या हातचं खेळणं होण्यापेक्षां माणूस म्हणून ओळखलं जाणं हेंच अधिक चांगलं ! खरोखर बेकारीचीं कारणं

वेगळीं असतांना त्यांना दृष्टिआड करून बायकांच्या माथीं त्याचं खापर फोडायला पहातां ? खरोखर धन्य आहे तुम्हां पुरुषांच्या शिताफीची ! " तिच्या स्वरांत उपरोध आणि मत-प्रतिपादनाचा आवेश दोहोंचं मिश्रण होतं.--दिवाकर मंत्रमुग्ध झाल्यासारखा तिच्याकडे पहात होता ! शेवटीं शेवटीं तर अरुणा भाटे आणि खानोलकर दोघांच्याही आवेशाचा पारा पूर्णांशाला पोंचायच्या बेतांत आला ! दिवाकरानं नकळत अरुणाच्या बाजूनें निकाल दिला !

तीं दोघें बरोबरच जिना उतरलीं. तो कौतुकानें म्हणाला, " तुमच्यासारखे वकील भेटले तर स्त्रीदास्यविमोचनाच्या चळवळीला यश यायला काय उशीर ? "

तिचा चेहरा स्तुति ऐकून लाजेनं गोरामोरा झाला ! वादाच्या भरांत निर्भयपणें नजरेला भिडणारी नजर हळूंच खालीं वळली !

थोडं गोंधळून, किंचित् थांबून तिनें मागें राहिलेल्या खानोलकरांना हांक मारली. हातांतील चारपांच ग्रंथराज सांवरीत खानोलकर लगबगीनें आले.

मिस्किलपणानें हंसून पण प्रसन्न मुद्रेनें त्यांच्याकडे पाहून ती म्हणाली, " भांडून थकलांत खानोलकर आणि शिवाय defeat खाल्लांत तें वेगळंच ! आतां घरीं चला चहा घ्यायला.–द्या एक-दोन पुस्तकं त्यांतलीं माझ्याजवळ.–मग फिरायला जाऊं. " तिच्या स्वरांत मोहनीय आकर्षकता होती. खानोलकर तिच्यावरोबर गेले. खऱ्या खिलाडू वृत्तीचे होते ते दोन मित्र !

घरीं जातां जातां दिवाकरला क्षणमात्र वाटलं आपण कां नाहीं खानोलकर ?

  

दुसऱ्या वर्षीं इंटरच्या लॉजिकला ती त्याच्या वर्गांत आली.

वर्गाबाहेरही त्यांची केव्हां केव्हां गप्पांच्या निमित्तानं भेट होई, पण तिच्याशीं बोलतांना त्याला वाटे आपल्या गोंधळलेल्या वृत्तींना स्थिरता आली आहे, मनांत प्रस्फुट स्वरूपांत वावरणाऱ्या इच्छा-आकांक्षा आपल्यापुढें साकार स्वरूपांत उभ्या आहेत!

पण थोड्याच दिवसांत तिनं त्याच्याजवळ जाहीर केलं, "मी आतां जाते पुन्हां गणिताच्या वर्गांत."

"कां? कां?" तो एकदम निराश झाला.

"मला नाहीं बाई हा AEIO चा गोंधळ उमजत! गणित आपलं बरं धोपटमार्गी."

"माझ्यासारखा मास्तर असतांना समजत नाहीं म्हणतां! चांगलाच कॉम्प्लिमेंट आहे आम्हांला!—अन् तुमच्या सगळ्या मैत्रिणींनीं तर लॉजिकच घेतलं आहे?"

"घेतलं असेल!–त्यांना येतं म्हणून घेतलं. माझ्या नाहीं डोक्यांत शिरत–उगीच लोकांनीं केलं म्हणून आपण करायचं कां काय?"

तिचा स्वतःवरचा विश्वास ढळवणं हीच जगांत मुष्किलीची गोष्ट होती!

"किती-किती हट्टीपणा!" तो एकदम म्हणाला. त्याच्या स्वरांत कौतुक होतं, दृष्टींत मार्दव होतं-क्षणमात्रच! अरुणा गोंधळली. त्याला कळलं कांहींतरी चुकलं! तिनं शेवटीं गणित घेतलं नाहीं, पण त्यानं जपून वागायचं ठरवलं.

सहामाहींत तिचा खूप वर नंबर आला.—तो हर्षोत्फुल्ल झाला. "बाकी तुम्हांला लॉजिक येत नाहीं खरंच!" तो द्वाडपणानें म्हणाला. "खरंच येत नाहीं," ती त्याला वात्रटपणांत हार जाणार नव्हती. "नंबर आला म्हणजे विषय आलेला असतो वाटतं? सध्यांच्या शिक्षणपद्धतींत तर असली धूळ वाटेल

त्याला फेकतां येते!"

त्याला वाटलं तिचे दोन्ही दंड धरून, नजरेला नजर भिडवून म्हणावं, "बोल, पुन्हां बोल तें वाक्य!" आणि पहावं हा अभिनिवेश टिकतो का!

ही कां नाहीं सुमित्रा? एकदम चरका बसल्यासारखं वाटलं त्याला!

~ ~ ~

'वर्ष दोन वर्षं ह्या कॉलेजमध्यें रहायची सोय नाहीं,' त्याच्या मनानं एकदम घेतलं!

~ ~ ~

त्याच्या पुढच्या वर्षाच्या सुरुवातीला समाजशास्त्रांतला एक संशोधनाचा विषय घेऊन त्यावर निबंध लिहिण्याकरतां एक वर्षाची रजा घेऊन दिवाकर मुंबईस आला. अर्थात् सुमित्रा आलीच. त्याच्या वागण्यावरून तिला वाटलं, आपण शिक्षण अर्धवट सोडलं तें त्याला पसंत पडलं नसेल. त्याला विचारून तिनं विल्सन् कॉलेजांत नांव घातलं आणि उच्च इंग्रजी विद्येचं, निर्जीवाला चेतना देणाऱ्या त्या वाघिणीच्या दुधाचं ती आकंठ पान करूं लागली! पण त्याच्या वृत्तींत फरक दिसेना, त्याचं गूढ औदासिन्य त्याचा पिच्छा सोडीना! तो तिच्याशीं फार चांगला वागत असे, पण त्याच्या वागण्यांत भावनेची उत्कटता नव्हती. ती स्वतंत्र मनाची नसली तरी स्त्रीजात होती.—तिच्या हालचालीबद्दलचं त्याचं औदासिन्य, त्याच्या वृत्तींतला उत्कटतेचा अभाव, त्याच्या स्पर्शांतला भावनाशून्य गारठा! त्याच्या बाहुपाशांत, अत्यानंदाच्या, उन्मादक आत्मविस्मृतीच्या अनुभवाऐवजीं तिला जास्तच थिजल्या-सारखं वाटे!

~ ~ ~

एके दिवशीं त्याच्या एका मैत्रिणीनं त्याला आग्रहानं सिनेमाला नेलं. खूपच उशीर झाला त्याला घरीं यायला. तो जाणार आहे अशी कल्पना नसल्यामुळं सुमित्राहि वाट पाहून थकली. ती त्याच्याबरोबर सिनेमाला जाण्याकरतां म्हणून तयार होऊन वाट पहात होती, पण त्याला घरीं यायलाच जवळजवळ नऊ वाजले !

"बराच उशीर झाला." ती स्वाभाविक म्हणाली.

'हो, सिनेमाला गेलों होतों. तुला कळवायला सवडच नव्हती. खरं म्हणजे मी जाणार नव्हतों पण ..."

"पण काय ?"

"त्या मिस् शिरगांवकर सोडीचनांत आज. कधींचा त्यांचा आग्रह चालला आहे आपण सिनेमाला जाऊं म्हणून."

तो रविवार होता. संध्याकाळीं आपण सिनेमाला जाऊं असं दिवाकर सकाळीं म्हणाल्यामुळेंच सुमित्रा वाट पहात होती !

तिला एकदम चमत्कारिक वाटलं, वाईटही वाटलं. पण लगेच तिनं विचार केला, "किती मत्सरी आहों आपण ? - त्यानं एखाद्या मैत्रिणीबरोबर सिनेमाला सुद्धां जाऊं नये का ?" प्रयत्नानें तिनें आपल्या मनांत येणारे अनेक विचार दाबून टाकले आणि शक्य तितक्या हंसतमुखानें पुन्हां बोलण्याला सुरुवात केली ! तिला लोभनीय वाटणाऱ्या गुणांच्या यादींत मत्सर नव्हता ! आजचा आपला विजय, आपलं वागणं त्याला खास आवडेल अशी तिची अपेक्षा !

  

तें वर्ष संपलं. तीं दोघेजण पुण्यास आलीं. अरुणा आतां सीनियर बी. ए. मधें होती. पुन्हां तोच तळमळ लावणारा, हुरहूर थांबवणारा, अप्रिय पण गोड सहवास ! भोळी बिचारी अरुणा ! 'सर' आपल्या वादविवादांत भाग घ्यायचं कां टाळतात

हेंही तिच्या फारसं लक्षांत आलं नाहीं !

ती खरी विद्यार्थी होती. बरंच लक्ष अभ्यासांत, कधीं विद्यार्थ्यांत मिसळून वादविवाद. कॉलेजच्या आवारांत अनेकांच्या मनांत उद्‌भूत झालेल्या प्रेमभावनेला तिच्या अंत:करणांत जागाच मिळाली नव्हती.

" उगीच आपलं बाकीच्यांनीं प्रेम केलं कीं आपणही करायचं कां काय ? " आपल्या स्वभावानुरूप ती गमतीनें पण प्रामाणिकपणें म्हणे.–खरंच तिला तिचा प्रेमविषय जगांत सांपडलाच नव्हता !

बी. ए. चं वर्ष संपत आलं. दिवाकराला केव्हां केव्हां मुक्त झाल्यासारखं वाटे, केव्हां केव्हां प्रकाश गेल्यासारखं वाटे ! तिच्या भोंवतीं त्याच्या अंतःकरणाचे नाजूक धागे त्याच्या प्रतिकाराला न जुमानतां रोजच्या रोज विणले जात होते.

आणि ती ! —

ती आपल्या मैत्रिणींना दिवाकराविषयीं अभिमानानें एवढंच सांगे–" विषय समजावून द्यावा तर प्रो. फडक्यांनींच ! "

दिवाकराला अवमानित झाल्यासारखं वाटे !

स्वत:ची स्वतःला न कळण्याइतकी त्याच्या भावनांची गुंतागुंत झाली होती ! जिला त्यानें प्रयत्नपूर्वक टाळलं ती आतां ओघानेंच त्याच्यापासून लांब जाणार होती. पण पहिल्या कल्पनेचा त्याला अभिमान वाटला होता, दुसरी परिस्थिति त्याला अगतिकपणें पत्करणं भाग होतं !

ह्याच विचारांचीं आंदोलनें त्याच्या मनांत चाललीं असतांना त्याला कळलं कीं, आपली विद्यार्थिनी बी. ए. झाल्यावर दोन वर्षं आपल्याच मदतीनें शिकणार आहे !

पुन्हां त्याच्या विचाराला वेगळी दिशा लागली ! अप्रिय

परंतु इष्ट गोष्ट घडत असतांना मनाला हुरहूर लागली तरी एकप्रकारची शांतता वाटत असते. इष्ट गोष्ट करण्याची जबाबदारी आपल्यावर पडली कीं ह्या अप्रिय कृतीचा ताण मनाला असह्य होतो !

खरोखरच अरुणा बी. ए. झाल्यावर एम्. ए. चा अभ्यास करूं लागली !

आणि दिवाकर Foreign Scholarship ची खटपट करूं लागला !

त्याला Scholarship मिळाली नाहीं, पण त्यानं परदेशगमनाच्या विचाराचा पिच्छा सोडला नाहीं.

पुढच्याच बोटीनें तो विलायतेला जाणार होता.

सुमित्राचं दुःख, अरुणाचं "सर, माझ्याच एम्. ए. च्या वेळेला कशी तुमची विलायतेला जायची वेळ आली ?" अशी निर्व्याज (!) प्रेमाचीं, आदराचीं दर्शक वाक्यं, स्वतःचा झालेला असीम कोंडमारा-हें सारें आतां दिवाकराला असह्य झालं !

त्याचा श्रीधरही तिथें नव्हता.—पण ज्याच्याजवळ बोलल्यास हलकं वाटेल, आपल्या विचारांची गुंतागुंत ज्याला कळेल आणि आपल्या दु:खाबद्दल ज्याला सहानुभूति वाटेल असा मनुष्य जगांत एकटा श्रीधरच होता !

प्लँचेटच्या हातून भराभर ओळी लिहिल्या जातात तशी स्वतःला जणूं काय नकळत दिवाकरकडून वाक्यं लिहिलीं जात होतीं :

"... तूं माझी एम्. ए. ची परीक्षा झाल्यावर पहिल्यांदां इथें आलास तेव्हांपासून आतांपर्यंत कितीतरी वेळां शंका प्रदर्शित केली आहेस, "दिवाकर, तुला कांहीं झालं आहे-कुठेंतरी कांहींतरी बोचतं आहे !" आणि तितके वेळां मी ती

गोष्टच टाळण्याचा प्रयत्न केला आहे. किती अभिमानी असतो मनुष्य ! पण आज कळतं आहे, कीं किती अभिमान असला तरी तो शेवटीं खऱ्या मित्रप्रेमापुढें निष्प्रभ ठरतो ! आजच मला ही उसळी कां आली याचं तुला आश्चर्य वाटेल.–जाऊं दे. यापुढें न बोलतां रहाणं अशक्य आहे.

"तुला आश्चर्य वाटलं कीं अगदीं अवचित् माझं विलायतेला जायचं ठरलं. खरं आहे, पण गोष्टी ह्या थराला येतील अशी माझी मलाही पूर्वी कल्पना नव्हती. आतां अशी परिस्थिति आहे कीं मी इथून जितका लवकर बाहेर पडेन तितकं बरं !

"प्रस्तावना नको, सरळ सुरुवात करतों.–माझ्या विलायतेचा माझ्या शिक्षणाशीं संबंध आहे, पण तो फार कमी–जगाला खरा वाटण्याइतकाच आहे. त्याचा खरा संबंध माझ्या वैयक्तिक आयुष्याशीं, त्यापुढें आ वांसून उभ्या राहिलेल्या प्रश्नाशीं–सुमित्रेच्या सुखदुःखाशीं आहे !

"जिला मी स्वतः पहायला जाऊन पसंत केली, स्वतः हात धरून घरांत आणली, तिच्यासंबंधानं तुझ्यासारख्या मित्राजवळ सुद्धां बोलतांना मला किती अपराधी वाटतं आहे त्याची तुला कल्पना येणार नाहीं. पण जगांतल्या सत्याचं अस्तित्व न बोलण्यानं नाहीसं होत नाहीं.

"आमच्या लग्नाला आठ वर्षं झालीं, आणि आठही वर्षं आम्ही एकमेकांपासून मनानं दूर होण्यांत गेलीं ! तिच्यामाझ्यामधे आज धटकला अफाट अंतर निर्माण झालं आहे. त्याला कारण ती स्वतः नाहीं, तिचा आणि माझा निर्माता आहे; आणि त्यामुळें तर मला तिच्याबद्दल जास्तच सहानुभूति वाटते. पण सहानुभूति म्हणजे प्रेम नव्हे. तिच्यासारख्या सद्गुणांच्या सजीव मूर्तीवर प्रेम न करणारा जगांत मूर्खांत गणला जाईल हें मला

कळतं-आणि मी तरी माझ्या दुर्दैवाचं गाऱ्हाणं जगापुढें कुठं नेतों आहे? जगाच्या उथळ अवलोकनाचीही मला कदर नाहीं-तुझ्या मतांची आहे.

"खरंच सुमित्रा सद्गुणी आहे; प्रेमळ, आज्ञाधारक, विनयशील, गरीब-किती विशेषणं सांगूं? जगांतल्या अतिशय आदरणीय अशा स्त्रीचं नांव जर कुणी मला विचारलं तर मी 'सुमित्रा' सांगेन. पण अनंत गुणांची ती खाण, माझ्या सुखाकरतां रात्रंदिवस धडपडत असतांना सुद्धां मला आकृष्ट करूं शकली नाहीं हें सत्य आहे! माझ्या संसाराचा भागीदार मला मानवकोटींतला पाहिजे होता, देवकोटींतला नव्हे! लग्नापूर्वी तिला कधीं अस्तित्व-स्वतंत्र अस्तित्व होतं कां नाहीं कोण जाणे! पण आज आठ वर्षं तिनं आपल्या व्यक्तित्वाचं माझ्या व्यक्तित्वांत इतकं विसर्जन केलं आहे, कीं आपण एका जिवंत माणसाशीं संसार करतों आहों असं मला कधीं वाटलंच नाहीं! अगदीं लग्नाच्या दिवसापासून अधूनमधून होणारे हे भास मला नुसतं बेचैन करीत, पण त्यांचं निश्चित स्वरूप मला कळत नव्हतं; -गेल्या तीनचार वर्षांत कळलं, नव्हे मनाला पटलं आहे. तिच्या सहवासांत एकतंत्री सुलतानशाहीचा आनंद, भक्ताकडून अनन्यभावानें पूजल्या जाणाऱ्या देवपदाचा आनंद मला मिळाला. पण, तुला कल्पना असेल श्रीधर, सुधारलेल्या मनुष्यांत-विसाव्या शतकांतल्या उच्च शिक्षणानें अंतर्बाह्य पालटलेल्या पुरुषांत-सुद्धां मानवजातीच्या प्रथमावस्थेंतलं शिकाऱ्याचं रक्त किती प्रभावी आहे त्याची! तिच्या सहवासांत उच्चपदाचा निष्क्रिय आनंद मला मिळाला, पण माझ्यांतला स्वभावतः प्रबळ असलेला शिकाऱ्याचा, पाठलाग करण्याचा जिवंत सक्रिय आनंद मारला गेला! मी जर सुलतानपदाचा भोक्ता असतों तर माझ्या सुखाला मोल

नव्हतं! मलाच कळलं नव्हतं;—जगाच्या दृष्टीनं सर्वसुखी असणाऱ्या मला कुठेंतरी कांहींतरी हरवलं आहे, आयुष्यांतल्या सुखाला धक्का देणारं कांहीं हरवलं आहे असं वाटे, पण काय तें कळत नव्हतं. तें सांपडलं तेव्हां कळलं, कीं आपल्याला हरवल्यासारखं वाटत होतं तें हें!

"खरोखरची वस्तु असली तर ती आपली करून तिच्या-वर हक्क तरी सांगतां येतो. पण माझी वस्तु जिवंत-जिवंत मनाचं मनुष्य आहे आणि माझा तिच्यावर काडीमात्र हक्क नाहीं! ती रूपानं सामान्य, गुणानं मानव-पण ती माझी हरवलेली वस्तु आहे! चार वर्षांपूर्वीं मी तिच्या सहवासांत आलों तेव्हांपासून हें सत्य मला कळलं आहे, पण तिला कळलं नाहीं! चार वर्षं मी तें सत्य मनांत कोंडलं, आतां तें कोंडलं जाणं अशक्य आहे! तिच्या क्रमप्राप्त सहवासांत मी यापुढें राहिल्यास, सबंध नीतिशास्त्र उलथंपालथं केलं तरी सुद्धां भुकेनं व्याकुळ झालेला माझ्यांतला जिवंत शिकारी त्या मानी वनराणीच्या भावनांची पारध केल्यावांचून रहाणार नाहीं!

"–पण मी विवाहित आहे.

"कदाचित् तूं मला दोषही देशील, कीं आपली जबाबदारी ओळखून मी असला विचार सुद्धां येऊं देतां कामां नये! मनाचे दरवाजे घराच्या दरवाज्याप्रमाणें सोईनें उघडतां लावतां आले असते तर किती बरं झालं असतं! पण तसं होत नाहीं. अमुक कल्पना मनांत येऊं द्यावी, तमुक येऊं देऊंच नये ह्या रूढ नीतिकल्पनांचे पाटबंधारे जीवनाचा अनिरुद्ध प्रवाह थोपवून धरायला असमर्थ ठरतात!

"माझ्या दूर जाण्यानें सुमित्राला दुःख होईल हें मला कळतं. माझ्या प्रेमाचा ओघ आपल्याकडे वळवण्याकरतां किती भक्तिभावानं

तिनं आराधना केली असेल तुला कल्पना नाहीं! पण आज वर्ष, मला सुखनिधान वाटणारं मनुष्य मला भेटल्यापासून, अंत:करणानं तिच्या सहवासांत राहून मी तिचा जो अवमान अवहेलना केली आहे त्यापेक्षां मरळ दूर गेल्याचं दुःख वरं! शरीराच्या अणुपरमाणूला दुसऱ्या विचारानें व्यापलं अ त्या देवतेचा सहवास-जाऊं दे!

"तुझी सावकाशीनं भेट झाली असती तर वरं झालं मी गेल्यावर सुमित्रेची काळजी तूं घेशीलच, पण मला यला एक दिवसाकरतां तरी मुंबईस ये.

दिवाकर"

  

दिवाकर गेला. कोमल वेलीचा सबळ आधार तुटा झालं सुमित्रेला! रडून रडून तिनं डोळे सुठीगारखे केले, प्र जपण्याबद्दल त्याला परोपरीनं बजावलं, नेमानं पत्र पाठव त्याच्याकडून वचन घेतलं!

तो तसं करतोही न चुकतां पत्र पाठवतो, तिला काळजी घ्यायला सांगतो, परदेशांतल्या वृत्तांताचीं खूपखूप लां वर्णनं लिहितो.—

बिचारं जोडपं!

## करभार ....................किंमत ८ आणे

सं० पु. आ. अत्रे

१९३४ सालीं बडोदें येथें भरलेल्या महाराष्ट्र-शारदेच्या दरबारांत वयोवृद्ध राजकवींपासून तों विशीच्या आंतील बालकवींपर्यंत वीस बडोदरवासी कवींनीं तिला सादर केलेला हा छोटा 'करभार' आहे. कै. राजकवि चंद्रशेखर, गाङ्गेय, सुरेश, सौ. अपर्णा देशपाण्डे या सुपरिचित कवींप्रमाणेंच वनमाला, भालचंद्र दत्त, शेखर इत्यादि उदयोन्मुख कवींचें काव्यही 'करभारां'त असल्यामुळें हा संग्रह केवळ हृदयंगमच नव्हे तर प्रातिनिधिकही झाला आहे.

मुखपृष्ठावर अंतरंगाला साजेसें कलापूर्ण 'सिल्हूट'.

## साहित्य आणि साम्यवाद ... लौकरच प्रसिद्ध होईल.

ले० पु. य. देशपांडे

'बंधनाच्या पलीकडे', 'सुकलेलें फूल', 'सदाफुली' या ललितकृतींमुळें श्री. देशपांडे हे केवळ प्रतिभाशाली कलावन्त म्हणूनच रसिकांना आजवर प्रिय होते. पण गतवर्षीं 'प्रतिभे'तून क्रमशः प्रसिद्ध झालेली त्यांची 'साहित्य व समाजजीवन' वरील मार्मिक लेखमाला ज्यांनीं वाचली असेल त्यांना त्यांच्या साहित्य व साम्यवाद या विषयांच्या सखोल अभ्यासाची चांगलीच ओळख झाली आहे. बडोदें येथील वाङ्मयपरिषदेच्या व्यासपीठावरील त्यांच्या भाषणानें तर नवमतवादी व पुरोगामी साहित्यसेवकांचें लक्ष त्यांनीं कधींच आपल्याकडे ओढून घेतलें आहे. 'साहित्य आणि साम्यवाद' या त्यांच्या आगामी ग्रंथामुळें मराठी टीकावाङ्मयांत निःसंशय एक बहुमोल भर पडेल असा आम्हांला विश्वास आहे.